ता ॥ कालत्रयीं अबाधिता ॥ मायादेवीसी तत्व
ता ॥ तें अघटमान ॥ १३ ॥ जरी माया सत ॥ तरी
कालत्रयीं अबाधित ॥ तरीं देखतसो निरसत ॥
स्वानुभवें ॥ १४ ॥ नहोतां मायोपसंव्हार ॥ केंवी
ब्रम्हीं साक्षात्कार ॥ हा स्वानुभवें निर्धार ॥ होय
योगींद्रासी ॥ १५ ॥ माया होकां असत ॥ हें बोल
णेंचि असंगत ॥ तें न भासे कदाचित ॥ जैसा वं
ध्यापुत्र ॥ १६ ॥ माया निवृत्ति कारणें ॥ वेदशास्त्रें

बोलिलीं साधनें ॥ तरी तयें अप्रयोजनें ॥ प्रति-
भासती ॥ १७ ॥ म्हणूनि न व्हे असत् सत ॥ जरीं
म्हणावी सदसत ॥ जरीं विरुद्ध धर्मासी ऐक्यता-
॥ हें अघटमान ॥ १८ ॥ सत् तें न व्हे असत ॥ अस
त् तें केंसें नि सत ॥ जैसें स्वस्कंदारोहण वृथा ॥ अ
संबद्धपें ॥ १९ ॥ मायासदसद्विलक्षण ॥ ऐसें-
बोलसी वचन ॥ तरी तें अघटमान ॥ सर्वथैव ॥
२० ॥ असत्याविलक्षणा नसे ॥ न सत्याविल

वि क्षणअसे॥यादोहींविलक्षणनसेदिसो॥व- उ
४९ स्तुकवणीचापैं॥२१॥ तरींमायाभिन्नह्मणी
जती॥तरींचैतन्यावीणकेवीस्फुरती॥तेब्र-
ह्मीचीनिजप्रकृती॥तरींभिन्नकेंसी॥२२॥जैं
सीचंद्राचीकळा॥नव्हेचंद्रासीवेगळा॥तैसी
ब्रह्माग्नीचीज्वाळा॥तेणेसीभिन्नकेंसी २३
जरीह्मणसीमायाअभिन्न॥तरीहेंअप्रमा- ४९
णवचन॥जेंमायेचेंनिरसन॥होयस्वानुभ

वें ॥ २४ ॥ जैंमायाउपसंव्हारे ॥ तें अविनाश
ब्रह्मउरे ॥ नरीं अभिन्नयाउतरे ॥ नबोलें तूं
॥ २५ ॥ मायायापरीभिन्नाभिन्न ॥ हें बोलणें
चि अघटमान ॥ येथें उपपत्तिसांगेन ॥ ते ऐक
पां तूं ॥ २६ ॥ जें भिन्नतें नव्हे अभिन्न ॥ अभि-
न्नतें नव्हे भिन्न ॥ याविरुद्धधर्मासी अवस्था
न ॥ हें असंबद्धपें ॥ २७ ॥ भिन्नाभिन्नविल-
क्षण ॥ ऐसें मायेतें तूं नम्हण ॥ तेथींचीविवंच

वि· नासांगेन॥ ते अवधारिजे॥ २८॥ भिन्नावेग उ·
५० ळे अभिन्न॥ आणि अभिन्नावेगळे भिन्न॥
तरी उभयासी विलक्षण॥ माया केवीं घडे॥ २९
जरी माया म्हणसी सावयव॥ तरीं वारिंये यु-
क्तीची धांव॥ नयेसी अव्यक्त हें नाव॥ बोलि
जे वेदांतीं॥ ३०॥ इयेसी वर्ण ना व्याक्ति॥ रूप
नास्थिती॥ तरीं सावयव ऐसें बोलती॥ तेही ५०
नविवेकी॥ ३१॥ माया निरवयव बोलती॥

तेसर्वथाकांहींचनेणती॥ब्रह्माकारेंस्फुरती॥तरींनिरवयवकेसी॥३२॥निरवयवमाये पासाव॥जगकेसेंनिहोयसावयव॥इयेंउपपत्तीनव॥निरवयवनव्हे॥३३॥विरुद्धधर्म निरूपिलेतुज॥हेंमायेसीनाहीं ऐसेंबुझ॥माझीमाय परीवांझ॥हेंअसंबद्धरूपें॥३४॥जें होयसावयव॥तेंहोयनिरवयव॥निरवय वतेंसावयव॥केसेंनिहोय॥३५॥मायाउ-

भयांविलक्षण ॥ हें असंगतवचन ॥ याविरु 
द्धधर्मासीभिन्न ॥ कांहींआथीचिना ॥ ३६ ॥
यापरीविकल्परचना ॥ माया कांहींचनिर्वच
ना ॥ ह्मणूनिहेअनिर्वचनीयजाण ॥ सर्व
काळीं ॥ ३७ ॥ जेदिसेअनिर्वचनीय ॥ तेंओ
ळखावीमिथ्यामय ॥ यायातथ्यइयेंचियें ॥
ऐसेंजाणानूं ॥ ३८ ॥ द्वादशविकल्पीकाल्पितां
॥ मृगजळासाजेवींअनिर्वचनियता ॥ तेसी

र मायाजाणतत्वता॥ मिथ्याभूतही॥ ३९॥ अ
निर्वच्चनीयदेखिली॥ यापरीमायानिर्वचिली
॥ जेमूलप्रकृतीबोलिली॥ सर्वेश्वरीं॥ ४०॥ ते
महामायादेहमहाकारण॥ सर्वेश्वराचेंजाण॥
तोनियेसीविलक्षण॥ केवळचेतन्यजें॥ ४१॥
महाकारणीअसेवर्तत॥ तेथेंसर्वसाक्षिलेंव्य
वस्थ॥ अभिमानीसर्वेश्वरतेथ॥ ऐसेंजाणानूं
॥ ४२॥ तोचिअभिमानकेसा॥ पूर्णब्रह्ममा-

वि ऐसा॥सर्वसाक्षित्वाचाठसा॥जेथेंबोलिजे॥ उ
५२ ४३॥हाचितत्पदार्थशबल॥तोपरमात्माकेव
ळ॥जयासीचोंदेहाचामळ॥मिथ्यारोप॥४४
॥स्वप्नदेहासीमिळूनिबंध॥प्रबोधींजेवींमि
थ्यासिद्ध॥तैसाचोंदेहांसीसंबंध॥परमात्म-
यासी॥४५॥हाचिशबलतत्पदार्थ॥शोधिलि
याउरेपरमार्थ॥तोविशुद्धहामथितार्थ॥तु- ५२
वांजाणिजसु॥४६॥घटाभावींघटाकाश॥तें

जेसें महदाकाश ॥ माया निरासीं स्वप्रकाश ॥
ब्रह्म परमात्म्याची ॥ ४७ ॥ ऐसें तत्पदार्थाचें शो
धन ॥ विस्तारें केलें कथन ॥ तें पुनरपी तुज सां
गेन ॥ आवांकुनी ॥ ४८ ॥ ब्रह्मांड हिरण्यग
र्भ पाया ॥ मूळ प्रकृती देह चतुष्टया ॥ परमात्म
तो अप्रमेय ॥ परब्रह्म पैं ॥ ४९ ॥ उत्पत्ति स्थिती
संव्हार ॥ सर्वसाक्षित्वव्यवहार ॥ याचों अवस्थे
चा ज्ञातार ॥ तो अवस्था केसेनी ॥ ५० ॥ ब्रह्मा-

वि· विष्णुमहेश्वर॥ आणिचौथासर्वेश्वर॥ हेसा उ·
५३ कारतोनिराकार॥ जाणपरमात्मा॥ ५१॥ एवं
मायागुणविस्तार॥ हाचतुर्विधव्यवहार॥ पर-
मात्मातोनिर्विकार॥ मायातीत॥ ५२॥ ईश्वरीं
सृष्ट्यादिकर्तृत्व॥ तेंमायागुणीआरोपित॥
परमात्मयासीतत्वता॥ तेंनघडेचिपैं॥ ५३॥
सृजीविश्वजरीतोमिथ्या॥ तरीसर्जनकेवीं ५३
सत्य॥ होयसृष्टीचेंयाथातथ्य॥ तेंहीमिथ्या

मूत॥ ५४॥ प्रतिपाल्यजें विश्वत्व॥ त्यासिज
र्शी मिथ्यात्व॥ तरीं ईश्वरीं प्रतिपालकत्व॥ के
विं घडे॥ ५५॥ जैसा वंध्येचा पुत्र॥ त्यासि हो
यजो वैंशत्रु॥ न यासी वधाचया चा मंत्र॥ नोत
वलटिकाचि कीं॥ ५६॥ तैसा प्रलयींसंव्हारे
प्रपंच॥ तो मिथ्या हा निर्वेच॥ तरीं संव्हारक
र्ता हा साच॥ केसेनी ह्मणावा॥ ५७॥ जरीं प्र
पंच साच होता॥ तरीं कैसेंनी संव्हारता॥ ह्मण

वि निअसत्यासीसत्यता ॥ साचनमानावी ॥ ५८ उ.
५४ मायाब्रह्मीचाविवर्त ॥ नोमिथाऐसासिद्धांत
॥ तत्कार्यप्रपंचअनित्य ॥ हेंकायबोलावें ५९
नियमपक्षींनियंतृत्व ॥ दृश्यपक्षींद्रष्टृत्व ॥ का
र्यपक्षींकारणत्व ॥ ऐसीस्थितीपैं ॥ ६० ॥ नेम
दृश्यकार्य ॥ गजमिथ्यामायामय ॥ तरीनियं
तृत्वादिऐश्वर्य ॥ ईश्वरींकेंसेंनी ॥ ६१ ॥ तरीस ५५
र्वहीमिथ्यात्व ॥ तरीसाचकेंसेंनिसाक्षित्व ॥

ह्मणॄनिमायीकईश्वरत्व ॥ नाहींपरमेश्वरासी
॥ ६२ ॥ रजश्चवळेंमायेचा ॥ विटाळनलगेसाचा
॥ तेपरब्रह्मनिःप्रपंच ॥ जाणशुद्धतत्पदार्थ
॥ ६३ ॥ स्वस्वरूपिविश्रांत ॥ जोपरमात्मानि
श्रांत ॥ तोचिशुद्धतत्पदार्थ ॥ जाणपरमात्मा
॥ ६४ ॥ दुसरेंपणातेंव्यालें ॥ तेंसरोवरोदक-
आटलें ॥ तेथेंप्रतिबिंबझालें ॥ मुख्यबिंबची
॥ ६५ ॥ ऐसीमायासंव्हारे ॥ तेंब्रह्मावेगळेंई-

कि ॥ श्वरत्वनुरे ॥ नरीब्रह्मीईश्वरत्वहीउतरे ॥ जाण उ.
५५ ॥ लुटिकेंची ॥ ६६ ॥ उसाचीं निपाडें सांडुनी ॥ जैसा
रसघेइजेगाळुनी ॥ तेवींमायिकरवोळ उतरूनी ॥
घेणेपरब्रह्म ॥ ६७ ॥ जेथें मनासहित ॥ वाचानि
वर्तलीयासमस्त ॥ परमात्मयासीतत्वता ॥ ते
निजस्वरूपपें ॥ ६८ ॥ एवंतत्पदार्थाचेंशोधन
विस्तारेंकेलेंकथन ॥ उभयलक्ष्यांशानेंसंघट ५५
न ॥ आतांसांगिजेल ॥ ६९ ॥ ॥ इतिश्री

षड्विवेकसिंधौसंव्हारक्रमेगुरुशिष्यसंवा
देमहाकारणदेहनिरसनपूर्वकंतत्पदार्थ-
शोधनंनामषष्ठंप्रकरणंसमाप्तम्॥ ६ ॥
॥श्रीगुरुनाथार्पणमस्तु॥ ॥शुभंभ
वतु॥ ॥ छ॥ ॥छ॥ ॥

---

श्रीगणेशायनमः॥ जोमुनिराजमुकुंद॥
ज्ञानियांमाजीगोविंद॥स्वानुभवेंआनंदकं

वि
५६

द॥स्वयेंचितो॥ १॥ आतांयोजिजेलसायुज्य
ता॥ नेणोंपाविजेतत्वता॥ तेपरब्रह्मेसींनिष्प्र
नता॥ बोलिजेलमहांवाक्य॥ २॥ हेंसातवेंप्र
करण॥ महावाक्याचेंअंतःकरण॥ स्वयंज्यो
तीकारण॥ परमात्माची॥ ३॥ तत्पदार्थत्वंप
दार्थ॥ यादोहोंचाजोलक्ष्यार्थ॥ तयासीऐक्य
फलितार्थ॥ बोलिजेमहावाक्यें॥ ४॥ तत्‌श
ब्देंपूर्णचैतन्य॥ तेंचित्वंशब्देंपृथक्चैतन्य॥

उ
५६

जें बोलिजे पृथक् चैतन्य ॥ तें चि पूर्ण चैतन्य-
जाणिजे ॥ ५ ॥ ह्मणूनि ब्रह्म तूं होसी ॥ हा अ
र्थ महावाक्यासी ॥ तरी परमात्म्यासी ॥ तुज
ऐक्यपें ॥ ६ ॥ तंव शिष्य बोले वाक्य ॥ जी ईश्व
रेंसी मज ऐक्य ॥ अग्निसी होणे सख्य ॥ हीं वा
सीजा कैसेनी ॥ ७ ॥ तो व्यापक मी परिच्छिन्न
॥ तो स्वतंत्र मी पराधीन ॥ तो स्वामी मी सेवकज
न ॥ तरी ऐक्य कैसेनी ॥ ८ ॥ तो सृष्ट्यादि कार्य

कि ५७

कर्ता॥ मजनिरंतरशोच्यता॥ मीबांधलोंतो-
सोडविता॥ नरींतदात्माकैसेनी॥ ९॥ तोनियं
तासर्वेश्वर॥ मीनियम्यअनीश्वर॥ तोनित्य
मजसंसार॥ अनादिसिद्ध॥ १०॥ तोकर्मफल
दाता॥ मीकर्मफलभोक्ता॥ नरींईश्वरासीम
जऐक्यता॥ केसेनीजा॥ ११॥ मगबोलेकृपा
सिंधु॥ श्रीगुरुपूर्णबोधु॥ हागाउपाधिक
ल्पितभेदु॥ तत्त्वंपदार्थासी॥ १२॥ ऋवर्णलो

उ॰ ५७

हाचादर्पणी ॥ एकचिसुखवासीहोतीदोनी ॥
तैसेंअसंबंधेंमाया । अविद्येचेनी ॥ ब्रह्मचिजी
वेश्वर ॥ १३ ॥ मायोपाधिब्रह्मतोपरमात्मा ॥
अविद्योपाधिब्रह्मतोजीवात्मा ॥ उपाधिवि
रुद्धधर्मात्मा ॥ जीवेश्वरासी ॥ १४ ॥ तुवांबोलि
लेईश्वरगुण ॥ तेमायाआरोपितजाण ॥ पर
मात्मातोचिनिर्गुण ॥ ईश्वरस्वरूप ॥ १५ ॥ अ
विद्याकल्पितजीवधर्म ॥ तोमिथ्याऐसेंबुझप

वि· र्म॥ तत्वताजिवाचानिजधर्म॥ तेंकेवळब्रह्म उ·
५८ पें॥ १६॥ अविद्येचेंअनित्यत्व॥ आणिमाये
चेंमिथ्यात्व॥ हेंशोधिलियाअनिर्वचनीय-
त्व॥ प्रसंगेंकरूनी॥ १७॥ ईश्वरींईश्वरत्वमा
यिक॥ जीवींजीवत्वआविद्यक॥ उभयनिरा
सीं उरे एक॥ केवळब्रह्म॥ १८॥ जेंत्रिविधल-
क्षणातें॥ जोजाणतोनिरुतें॥ तोचिनिरसी ५८
भेदातें॥ येरांभेदभिन्न॥ १९॥ प्रथमतेजह

ल्लक्षणा ॥ दुसरी अजहल्लक्षणा ॥ जहदजह-
लक्षणा ॥ नेंनिसरीपें ॥ २० ॥ जहल्लक्षणा बो-
लिजे त्याग ॥ अजहल्लक्षणा अत्याग ॥ जहद
जहल्लक्षणा त्यागात्याग ॥ नो अत्याग ॥ २१ ॥
वाच्यांशत्यागावा जीवाचा ॥ लक्ष्यांश घ्यावा
नेथीचा ॥ वाच्यांश सांडिजे ईश्वराचा ॥ घेणें
शुद्धांश ॥ २२ ॥ शबलांश सांडिजे ॥ शुद्धांश
मांडिजे ॥ जहदजहल्लक्षणा बोलिजे ॥ वेदां

वि. नशास्त्रीं ॥ २३ ॥ जैसें फोलकट सांडिजे ॥ शु उ.
५९ द्धतांदूळ घेइजे ॥ तैसा उपाधि निरसिजे ॥ स्वी
कारिजे शुद्ध चैतन्य ॥ २४ ॥ म्हणूनि जहदजह
ल्लक्षणा ॥ हें महावाक्यीं प्रमाण ॥ इतर दोन्ही-
ह्लिलक्षणा ॥ तयांचें काज नाहीं ॥ २५ ॥ जो दंडि
येंबैसला ॥ तोचि घोडा आरूढला ॥ इनकेन
आनंद झाला ॥ ऐसें कोविंघडे ॥ २६ ॥ दंडियें घो ५९.
डा अन्य ॥ हें उपाधीचें लक्षण ॥ तो आपणापां

नव्हे भिन्न ॥ कांहींचजी ॥ २७ ॥ नानरीं काशि
ये भेटला ॥ तो चि अन्यदेशीं देखिला ॥ येनां
जातां काय भिन्न झाला ॥ आपणपातें ॥ २८
तो देशकाळ सांडुनी ॥ अन्यदेशकाळ त्यजुनी
॥ उभयतां एक चि जाणुनी ॥ जेसा भेद निरसे
॥ २९ ॥ तेसी ईश्वरींची निरसावि माया ॥ सर्व
ज्ञत्वादि तन् कार्या ॥ उरे मायातीत अद्वय ॥
परब्रह्मरूपें ॥ ३० ॥ जिवाचें निरसावें अज्ञान ॥

कार्येसहितविपरीतज्ञान॥ त्यजूनितदुपा-
धिलक्षण॥ हेधर्मनिरसावे॥ ३१॥ उरेजेंशुद्ध
चैतन्य॥ तेविंबोलिजेपृथक्चैतन्य॥ तेणेंसी
जाणअनन्य॥ ईश्वरस्वरूप॥ ३२॥ तयापृथ
क्चैतन्यासी॥ ऐक्यजेथेंपूर्णचैतन्यासी॥ जा
हालेभेदआपुलेनिरसी॥ एकरूपलें॥ ३३॥
जीवात्मापरमात्माएकहोइल॥ तेथेंदुसरेप
णकेसेंउरेल॥ आणिप्रदेशित्वनिमेल॥ तत्

क्षणीची॥ ३४॥ परमात्मा तंव नित्यानंद॥ तेथें नाहीं सुखदुःखें सी संबंध॥ तरी भिन्नत्वाचा अनुवाद॥ तेथें केविं घडे॥ ३५॥ आणि पूर्णचैतन्यासी॥ ऐक्य पृथक् चैतन्यासी॥ तें सद्रूप त्वें अपरोक्षत्वासी॥ ऐक्य सिद्धचि असे॥ ३६॥ परमात्मा जो वेगळा॥ तोचि जीवात्मा झाला॥ तेथें दुसरेपणें उरला॥ हें केविं घडे॥ ३७॥ जंव परमात्मस्वरूप नेणिजे॥ तंव

वि· दुसरेपण ऐसें कल्पिजे ॥ जीवात्म्यानें तें वि- ठ·
६१ होइजे ॥ तेथें परोक्ष केंचें ॥ ३८ ॥ घटाभा-
वीं घटाकाश ॥ मठाभावीं मठाकाश ॥ दोहोंच
ऐक्यीं महदाकाश ॥ तें अद्वयचि असे ॥ ३९ ॥
तैसें अविद्यामायेचे निरासीं ॥ ऐक्य होणें जी
वेश्वरासी ॥ ह्मणूनि जीवेश्वर भेदासी ॥ देति
ळांजुळी ॥ ४० ॥ एवं कार्योपाधी जीवात्मा ॥ का ६१
रणोपाधी परमात्मा ॥ उपाधी निरासीं तदा-

त्मा॥ स्वतःसिद्ध उभयांसी॥ अविद्याकार्यमा
याकारण॥ मिथ्यात्वदोहींचें निरसन॥ तेथें
जीवईश्वरासी ऐक्य जाण॥ नित्यसिद्धचि अ
से॥ ४२॥ तत्पदें ईश्वरब्रह्मासी॥ त्वंपदें जी
वब्रह्मासी॥ असिपदें जीवेश्वरब्रह्मासी॥ ऐ
क्यक्रियमाणजें॥ ४३॥ एवं महावाक्याचा अ
र्थ॥ तुज निरूपिला तत्त्वंपदार्थ॥ जेथें भेटे प
रमार्थ॥ नेटेंबोटें॥ ४४॥ कवण ऐसें ह्मणेल

॥महांवाक्यें ब्रह्म भेटेल॥ हें केसें निघडेल॥
अघटमान॥ ४५॥ जेथें वाचा निवर्तलीया॥
युक्ती खुंटलीया॥ हिंपुटी झालिया॥ चित्तवृ
त्ती॥ ४६॥ तें वाचे केसें बोलिजे॥ मनें नेणुनी
जाणिजे॥ स्वानुभवें अनुभविजे॥ परमतत्व
॥ ४७॥ बोलतां शास्त्रें झालीं वेडीं॥ वेदांतासी
पडे बोबडी॥ तेथें महावाक्यें फुडाफुडी॥ केविं ६२
होय॥ ४८॥ ऐसा ऐकतां आक्षेप॥ जंथें बोलि

जेलसाक्षेप ॥ तीनमानावाविकल्प ॥ येथिं
चाविषयीं ॥ ४९ ॥ ब्रह्मकीर अकथ्य ॥ तेंअ
सेयाथालथ्य ॥ परीनयेअनुभवपंथ ॥ गुरु
वाक्येंविण ॥ ५० ॥ नेतीमुरवेंअनुवादितां ॥
अनात्मनिरसितां ॥ वेदवाक्यासीप्रमाण-
ना ॥ ब्रह्मसाक्षात्कारीं ॥ ५१ ॥ तरींनेतीहाअ
र्थकेसा ॥ तुजनिरूपिजेलजैसा ॥ जेणेंउक
ळेआपैसा ॥ संसारधंदा ॥ ५२ ॥ जेंजेंमनेंजा

कि णिजे॥तेंतेंपरब्रह्मनव्हिजे॥मनातेंहिप्रका उ.
६३ शिजे॥प्रकाशेंजयाचेनी॥५३॥सर्वातेंमि-
थ्यालदेखिलें॥तेंज्ञानजयासीदृश्यझालें॥
तेथेंपरब्रह्मप्रकाशलें॥आपणपांची॥५४॥
असेअंधारीबुडाला॥तेणेंदीपउजळिला॥
तरीदीपेंतोदेखिला॥हेंनघडेचिकीं॥५५॥
येथेंदीपेंकायकेलें॥दृष्टीचेंतमफेडिलें॥ते ६३
थेंस्वयेंचिदेखिलें॥आपणयातें॥५६॥ते-

सेंदीपंचीणनिरुतें॥ जाणिजेजेविंआपणातें॥ नयादीपाहीजाणतें॥ आपणपांची॥ ५७॥ तैसें ज्ञानेंवीणस्वरूपा॥ नप्रकाशेआपणपां॥ तें अज्ञानवृत्तीदेखपां॥ ज्ञानेंचीकरूनी॥ ५८॥ ह्मणूनिज्ञानचीप्राण॥ हेंबोलणेंजरींअघट मान॥ नरींनघडेज्ञानेंविण॥ अज्ञाननिवृत्ति॥ ५९॥ नयाज्ञानातेंउपजवी॥ आत्मयातेंचें तवी॥ अज्ञानातेंदवडवी॥ श्रीगुरुवाक्य॥ ६०

तेंप्रमाणगुरुवाक्य॥जेंमहावाक्यासीऐक्य
॥येरअनर्थवाक्य॥ पाषंडजाण॥ ६१॥ महा
वाक्यश्रवणकाळीं॥उठलीज्ञानाचीज्वाळी
॥प्रज्वळेअज्ञानाचीहोळी॥ संसारसहित॥
६२॥ प्रपंचातेंनिरसूनी॥ परब्रह्मातेंपावुनी
॥ कृतार्थहोउनी॥मिरवेमहावाक्य॥ ६३॥अ
र्थींनिदर्शन॥ ऐकतुजसांगेन॥करूनीए
काग्रमन॥प्रीतिपूर्वक॥ ६४॥ दंडकारण्यींअ

सतां॥ मार्गमेळीं चालतां॥ पंथीं चियावनिता।
पुसतीसीतेतें॥ ६५॥ तापसांचियामांदियाळे
॥ पैलयेतातीमनोमेळें॥ तुजकारणउभेठेलें
॥ कल्पतरूसी॥ ६६॥ यांमाजीतुझाभ्रतार॥
कवणसांगेंनिर्धार॥ सफळहोईलसंसार॥
प्राणवल्लभे॥ ६७॥ त्याजयातेंदाखविती॥
तोनव्हेसीतेचापती॥ ह्मणूनिअसेनिरसिती
॥ नयेणेशब्दें॥ ६८॥ यापरीसमस्तां॥ नह्म

वि॰ णेसरलीसीता॥ रामदेखूनिआतां॥ तन्मय उ॰
६५ तापेंझाली॥ ६९॥ जेथेंन ह्मणूसरलें॥ तेथें-
येरीहींजाणितलें॥ सीतेनेंनसांगूनिसांगित
लें॥ प्राणनाथातें॥ ७०॥ यापरीउपनिषदें॥
प्रपंचातेंनेणवितीशब्दें॥ निरसूनिब्रह्मानं
दें॥ मुकींठेली॥ ७१॥ स्वरूपींविश्वआभा
सलें॥ तेंनाम्हणेमसरलें॥ जेथेंबोलणेंखुंटलें ६५
॥ तेंजाणपरब्रह्म॥ ७२॥ वेदनसांगूनसांगती

तेंयोगेश्वरनेणूनिजाणती॥ह्मणूनिवेदवा
कयंभयाणेहोनी॥ब्रह्मसाक्षात्कारी॥७३॥
जेथेंवेदांसीमुकेपण॥तेंअकथ्यवस्तूचेंक
थन॥तेंपरब्रह्मतूंजाण॥आपणपांची॥
७४॥वाक्येवीणअनेकविध॥दृष्टीपाहातां
अनेकभेद॥नेंनव्हेस्वरूपावबोध॥ऐसेंजा
णतूं॥७५॥ऐकूनिएकाचाहोयवेध॥परी
प्राप्तीविनानव्हेबोध॥नकरितांप्रपंचनि

वि· षेध॥ स्वरूपप्राप्तिकेंची॥ ७६॥ वेदान्तेंनी उ०
६६ समावेशें॥ विपरीतदृष्टिनासे॥ परीअज्ञा
ननिरसे॥ सुषुप्तिपरी॥ ७७॥ भवसहि·
तअज्ञानातें॥ ब्रह्मज्ञानविधुछितें॥ नया
तेंउपजवितें॥ श्रीगुरुवाक्य॥ ७८॥ ह्मणू
निमहावाक्यप्रमाण॥ ब्रह्मसाक्षात्कारीं का
रण॥ सकळप्रपंचाचेंनिरसन॥ होयजेणें ६६
॥ ७९॥ तेथेंकेवळब्रह्मचिउरे॥ असतांचिप्र

पंचविरे॥ अखंडवाक्यार्थस्फुरे॥ योगीज
नासी॥ ८०॥ अहंब्रास्मिब्रह्माहमस्मि॥
तेथींचा अर्थब्रह्मचिमी॥ ऐसे अन्वयव्य
तिरेकें ब्रह्मचिमी॥ ऐक्यबोलतीश्रुतिद्वय
॥८१॥ ऐसा अखंडार्थ॥ हाचिसमाधिसंप्र
ज्ञात॥ ऐसें बोले वेदांतसिद्धांत॥ बाह्याउ
भउनी॥ ८२॥ संप्रज्ञातसमाधिस्त॥ हरि
हरब्रह्मादीनित्ययुक्त॥ शुभाशुभकर्मातें

कि अलिप्त ॥ ब्रह्मावबोधें ॥ ८३ ॥ ज्ञानविग्रहीप- उ·
६७ रेश ॥ तयासीनाहींगुरूपदेश ॥ जोआदिगुरु
अविनाश ॥ ह्मणूनिनित्यमुक्ततो ॥ ८४ ॥ ईश्वरीं
चेंअंतःकरण ॥ ब्रह्मादिकतिघेजण ॥ तेहि
नित्यमुक्तजाण ॥ स्वयंबोधें ॥ ८५ ॥ तेमायो-
पाधितत्पदार्थ ॥ ह्मणूनिनमुक्तीपरमार्थ ॥
तरींतेनित्यमुक्तहाशब्दार्थ ॥ व्यर्थनह्मणा- ६७
वा ॥ ८६ ॥ पूर्वींजीवमगसुटती ॥ तेजीवन्मु

क्तबोलिजेती ॥ तयासीब्रह्मसंविती ॥ श्रीगु
रुप्रसादें ॥ ८७ ॥ उत्पन्नज्ञानीजेसनकादिक
॥ त्यांसिगुरुप्रसादेंस्फटिक ॥ जाह्लापूर्वज
न्मींदेख ॥ ज्ञानद्वारें ॥ ८८ ॥ अशेषप्रारब्धक
र्म ॥ तेणेंहोयदेहधर्म ॥ वदनंतरपुरेसीम ॥
यातायातीची ॥ ८९ ॥ जेदेहअसतांचिसुट
ले ॥ ह्मणूनिजीवन्मुक्तबोलिले ॥ परब्रह्म-
जाहले ॥ सच्चिदानंद ॥ ९० ॥ स्थूललिंगकार

णा। हें देहत्रयजीवासी बंधन॥ आणि कर्मप्र
यत्न॥ तें हीं जळे ज्ञानाग्नीनें॥ ११॥ जेसा वनी
वैश्वानर॥ पेटल्या करी तृणकाष्ठसंव्हार॥ ते
सा ज्ञानाग्नीनें संसारज्वर॥ जळे ब्रह्मवृंदाचा
॥ १२॥ अग्नीनें तृणकाष्ठ जाळिलें॥ तें अंगार
दशे उरलें॥ मग तें हि भस्म झालें॥ अवसरें क
रूनी॥ १३॥ तैसें ज्ञानाग्नीनें जाळिलें॥ देहत्र
यनिरसलें॥ परी मिथ्या सोपउरलें॥ दग्धप

ठन्यायें॥ १४॥ दग्धवस्त्रउरलेपण॥ तेंक-
रूनयेप्रावर्ण॥ साचासारिखेपण॥ परीतेंन
व्हेअनारिसें॥ १५॥ तेसादेहत्रयाचाठसा
॥ नव्हेचितोअनारिसा॥ परमात्मयासीफां
सा॥ पाडूंनशके॥ १६॥ जेसेंवुजाडियाचेंक
णवटें॥ क्षुधानिवृत्तिघटे॥ परशेतींवानव
टें॥ पिकूंनयें॥ १७॥ तेसाउरेइंद्रियआकार
॥ तेणेंघडेइंद्रियव्यापार॥ परीतयांसीनाहीं

वि संसार॥ कदांचीपें॥ ९८॥ जरीतूं ऐसें म्हण- रु
६१ सी॥ अभावझालिया अज्ञानासी॥ तरीपा-
नदेहत्रयासी॥ व्हावातत्क्षणी॥ ९९॥ जेथें
कारणसरे॥ तेथेंकार्यकेंचेंउरे॥ सूत्रनतूंर्व
उपसंव्हारें॥ तेथेंपटत्वकेंचें॥ १००॥ एथेंए
कउत्तर॥ करूनिमनएकाग्र॥ संदेहसाग-
राचापार॥ तेणेंपाविजे॥ १॥ धनुर्धरेंमोक ६१
ळिलें॥ कांहातालूनिसुटलें॥ तेंकर्मयेगेंज

सें धाविनलें॥ गगनमार्गें॥ २॥ नातरी कुला
लचक्राचा भंवरा॥ जैसा भोंवे गरगरां॥ तैसा
कर्मवेगाचा उतारा॥ जंव घरी असे॥ ३॥ जे
थें कर्माचा वेग सरे॥ तेथें धाव आपसयाची
पुरे॥ बुझणे येणें चि प्रकारें॥ देहस्थिती॥ ४
॥ प्रारब्धकर्माचेनि योगें॥ देह हूय धाऊं ला
गे॥ तें सरलेया राहे उगें॥ होय देहपात॥ ५
जैसा अंगारदशेचा वन्हि॥ अंगाराचा ग्रास

वि करूनी॥ निर्वाणस्वरूपींविसावुनि॥ जैसा उ
७० लीनहोय॥६॥ तैसाब्रह्मज्ञानहुताश॥ क-
रीदेहत्रयाचानाश॥ गिळूनिस्वसाक्षित्व
प्रकाश॥ लीनहोयस्वरूपीं॥७॥ हीसायो-
ज्यतामुक्ति॥ तुजसांगितलीनिगुती॥ तेथें
नाहींपुनरावृत्ति॥ कदांचापैं॥५०८॥ ॥
इतिश्रीमद्विवेकसिंधौसंव्हारक्रमेगुरु- ७०
शिष्यसंवादेजीवपरमात्मानदात्मऐक्य-

विवरणंनामसप्तमप्रकरणंसमाप्तम् ॥
॥७॥ ॥श्रीगुरुनाथार्पणमस्तु॥
शुभंभवतु॥ ॥छ ॥छ॥

---

श्रीगणेशायनमः॥ सलोकतासमीपता
॥तिसरीस्वरूपता॥ यातीहीचामार्या॥ कां-
चीबाजेकाळाची॥१॥ चौथीसगुणासायु-

ज्यता॥ तेंहोजाणमायानिर्मिता॥ नरीयामु
क्तीचीआतां॥ ज्ञनेमानिसि॥ २॥ यामुक्ती
चेपरीबंधन॥ नचुकेपुनरागमन॥ जयवि-
जयासीसांगेपतन॥ तेंकवण ठायाहुनीझा
लें॥ ३॥ जेतुलेंआकारासीआलें॥ तेतुलेंमा
यामयह्मटलें॥ विनाशातेंपावलें॥ महाप्रल-
यीं॥ ४॥ जेथेंमायाचिसव्हारें॥ तेथेंलोककें
चाउरे॥ ह्मणूनिमुक्तिबारे॥ ज्ञनेसाचमा-

र्निसी॥५॥म्हणूनिनिर्गुणसायुज्य॥तेचिमुक्तिज्ञा
णपूज्य॥जेटाकावेदशोसाम्राज्य॥सांडिलेंपू-
र्वादिकीं॥६॥जैसाक्षीराब्धीचातरंग॥नहो-
तांआकारासीभंग॥क्षीराब्धीसीनाहींविभा
ग॥ऐक्यभावनेचा॥७॥तैसामृत्युनहोतांदे
हासी॥म्हणेसायुज्यताजीवन्मुक्तासी॥तरीं
देहपातझालियातयासी॥कायअन्यम्हणू-
येइल॥८॥तूंम्हणसीहाचिमोक्ष॥परीबंध

चिजाणसापेक्ष॥ तरीसाचभेदपक्ष॥ कोंनमा
नावा॥ ९॥ येथेंपरिहारसांगेन॥ जेंलटिकेंचि
बंधन॥ तेथेंमोक्षतोकवण॥ साचमानी॥ १०
॥ आत्मयासीजेंजेंबंधन॥ तेंतवप्रसिद्धचि-
अज्ञान॥ त्यासीतरीलटकेपण॥ विस्तारेंसां
गितलें॥ ११॥ जरीअज्ञानसाचहोतें॥ तरीकें
सेनीसंव्हारतें॥ महामोक्षतेणेंमतें॥ केवींघ
डे॥ १२॥ जेथेंमोक्षचिनाहीं॥ तेणेमतेंकाजका

ई॥ आतां असो कार्यत्रयीं॥ अज्ञानमिथ्या
॥१३॥ आणि कें जीं हीं बंधनें ॥ तीं ज्ञानोत्पत्ति
काळीं होती लीन ॥ तयासी सत्यत्व कवणें ॥
प्रकारें होइल॥ १४॥ ठाई चांची गांव नाहीं॥ ते
थें सिमा पुससी काई॥ म्हणूनि मोक्षाचि मिथ्या
पाहीं॥ आत्मयासी॥ १५॥ अविद्याकल्पित बं
धन॥ विद्याकाल्पित मोक्षसाधन॥ होती मि-
थ्यात्वें जाण॥ मायामयत्वची॥ १६॥ नित्यमु

 क्तजीवन्मुक्त॥ हे कडसणी॥ निभ्रांत॥ जे उपा 
 धिभेद आरोपित॥ ह्मणोनियां॥ १७॥ जे येंमा
येसी मिथ्यात्व॥ तेथें साचें कैंचें इश्वरत्व॥ तरी
ईश्वरीं नित्यमुक्तत्व॥ तेंहीं लटिकें जाण॥ १८॥
प्रत्यक्चैतन्यजीवत्व॥ तरी तें अविद्याकल्पित
॥ तेथें जीवन्मुक्तत्व॥ तें हो लटिकेंचि॥ १९॥ जी
वेश्वरांसी अद्वयता॥ हें शबलपक्षीं कल्पितां॥ 
म्हणूनि सांडी भेदवार्ता॥ तूं सर्वथैव॥ २०॥

ऐसा वाचांचि करिसी विरोध॥ जरी ह्मणसी साच भेद॥ तरी तूं करीं पां अनुवाद॥ पुसिजे लजें॥ २१॥ भेद काय पारमार्थिक॥ किंवा तो औपाधिक॥ या दों हीं माजी पक्ष एक॥ अंगिकारिं पां॥ २२॥ जरी पारमार्थिक भेद॥ परमार्थतो अद्वयानंद॥ ऐसा श्रुतीचा संवाद॥ ह्म पूं निसांडी कुमत हें॥ २३॥ सबाह्याभ्यंतर ब्रह्म॥ एकमेवाद्वितीयं ब्रह्म॥ इत्यांतिक परमार्थाचें

वि वर्म॥ अद्वय बोलती॥ २४॥ नेह नानास्ति किं- उ·
७४ चन॥ ऐसें श्रुतीचें वचन॥ भेदातें करिती निर-
सन॥ तरी संतर्केसा॥ २५॥ वेदवाक्यासी विरु
द्ध॥ नोपक्षनव्हे प्रमाणसिद्ध॥ म्हणूनि भेदा
चा निषेध॥ करी स्वानुभव॥ २६॥ माया अवि
द्येचा निरासी॥ ब्रह्मचि होणें जीवेश्वरासी॥ त
रीं कवणें प्रकारें त्यासी॥ भेद उरेल॥ २७ म्हणूनि ७४
पारमार्थिक भेद॥ बोलतां थोर असे प्रमाद॥

तरीसांडिंहा मिथ्यावाद॥ जोविरुद्धश्रु तीसी
॥२८॥ जरीम्हणसी ओपाधिकभेद॥ तरीआ
मचाविपक्षहोयसिद्ध॥ एताद्दूषयींविषाद
॥आर्याचीना॥२९॥ मायोपाधिब्रह्मतोशिव
आविद्योपाधिब्रह्मतोजीव॥ आणिमायाअ
विद्येचास्वभाव॥ तोतंवमिथ्याभूत॥३०॥
एवंमिथ्यात्वउपाधीसी॥ उपाधिजनितभे
दासी॥ सत्यतहोयऐसी॥ युक्तीनघडे॥३१

वि॰ म्हणोनी ईश्वरेंसीं ॥ भेदमिथ्यासकळजीवांसी ॥ उ॰
७५ आणित्यापरब्रह्मासी ॥ लटिकाचिपैं ॥ ३२ ॥ ए
वंपंचविधभेदासी ॥ लीपीपुसिलीमिथ्यात्वेंसी
॥ ब्रह्मतें अद्वयचिपरियेसीं ॥ जाणआपणपें
ची ॥ ३३ ॥ तैसेंचिजीवेश्वरासी ॥ आणिपरब्रह्मे
सी ॥ याचिपरीपरस्परेंसी ॥ भेदमिथ्याचिपैं ॥
३४ ॥ यापरीस्थावरजंगमासी ॥ परस्परेंचेतन ७५
अचेतनासी ॥ भेदमायामयजाणसी ॥ सकळ

ळटिकाची ॥ ३५ ॥ आणी कसां गिजेळ उपप-
त्ता । जेणें भेदासी नांहोय निवृत्ती ॥ अद्वय-
स्वरूपाची स्थिती ॥ बुझसी आपसयां ची -
॥ ३६ ॥ भेदविनाशाची उत्तरावस्था ॥ भेदस-
त्ना असत् किंवा सदसत् ॥ इहीं पक्षीं विक-
ल्पित ॥ परी ळटिकाचि तो ॥ ३७ ॥ सत् तरी नि-
जाकारें असता ॥ किंवा विनाश पावता ॥ वि-
नाशाची उभयावस्था ॥ तो भेद काय ॥ ३८ ॥ -

निजाकारेंवर्तत॥ जरीं भेद होयसत्॥ तरीं दे
खअसेनासत्॥ आकारहा॥ ३९॥ विनाशातें
पावत॥ जरीभेद होयअसत्॥ तरींसाचची-
आमुचासिद्धांत॥ भेदसत्नह्मणावा॥ ४०॥
विनाशाचीउत्तरावस्था॥ तोभेदसत्हेंम्हण-
तां॥ तरीवंध्याकुमराचीसत्तता॥ साचकांन
मानावी॥४१॥म्हणूनिभेदसंतूहेंवचन॥ तिहींक
ल्पींनव्हेप्रमाण॥ द्वितीयपक्षींदूषण ॥ तेंअ

इकपांतूं ॥ ४२॥ असत्भेद बोलिजेत् ॥ नरीं-
स्वपक्षीं असे वर्तत ॥ प्रत्यक्ष देखिजती अस
त ॥ सत् ऐसा ॥ ४३॥ बोलनां सद्सत् भेद ॥ बो
लिजे स्ववाच्य विरोध ॥ ह्मणूं निसांडिं हा शब्द
॥ जो मिथ्या द्वैतेंसी ॥ ४४॥ कवणीया परीन-
निर्वचे ॥ नरी भेद मिथ्या हें साचें ॥ जैसें आडं
बर स्वप्न भेदाचें ॥ नाथिलेंची ॥ ४५॥ स्वप्न
सत्य ह्मणूं तरीं नसे ॥ असत्य म्हणूं तरीं आभा

वि से॥सदसत्‌विरोधीकींवसे॥ हें अघटमान॥ उ
७७ ४६॥ स्वप्नींनाहींनेंचिदिसे॥ परीनिंद्रिस्थासी
साचभासे॥तैसेंना शवंतपरिभासे॥ अज्ञा
नजनासी॥ ४७॥ आतांअसोहाविस्तार॥
जगजीवआणिइश्वर॥ हाअशेषमायिकव्यव
हार॥तोतंवलटिकाचिकीं॥ ४८॥ म्हणूनिस्व
जातीय॥याचिपरीविजातीय॥स्वगतभेद ७७
तृतीय॥नाहींकेवळब्रह्मीं॥ ४९॥स्वरूपींप्रपं

चस्वजाती ॥ नानात्वतो विजाती ॥ ह्या द्विविध-
भेद मिथ्या स्थिती ॥ बोलिलों विस्तारें ॥ ५० ॥ स्व
गतभेदविरहित ॥ परब्रह्म अनाहत ॥ तें तंव-
स्वयें प्रकाशित ॥ ह्मणूनि ची ॥ ५१ ॥ विजाती-
यस्वजातीयस्वगत ॥ येणें त्रिविधभेदविवर्जि
त ॥ अहंताममताभावरहित ॥ परब्रह्म चिन्मा
त्र जें ॥ ५२ ॥ जेथें अनुवाद खुंटला ॥ विवादस
मूळ सरला ॥ झगडा तुटला ॥ जडदर्शनाचा ॥

वि ५३॥ मीतूंइत्यादिकव्यवहार॥ येथेंनाहींसा- टी.
७८ र॥ हेउठतीमायिकअंकुर॥ जेणेंआधारें ५४
जेंसर्वजीवांचेंजीवन॥ जगजनकाचेंजन्मस्था
न॥ आनंदाचेंनिधान॥ केवळब्रह्मजें॥ ५५॥
जेथींचाविवर्तहें विश्व॥ जेंसर्वेश्वराचेंसर्वस्व
॥ नेंब्रह्मदीर्घनाऱ्हस्व॥ निराकारपें॥ ५६॥ ज-
यानेंउपपादितां॥ चतुराननहीवक्ता॥ शिण ७८
ला नतत्वता॥ अगाधह्मणूनी॥ ५७॥ जेथेंनेण

णोनिमाल्लें ॥ जाणणेंहीखुंटलें ॥ जेथेंस्वयेंप्र
काशलें ॥ आपणपांची ॥ ५८ ॥ जेथेंआशेषवे
गळें ॥ तेंचिअशेषझालें ॥ झालेंपणनाथिलें
॥ तेथेंतेंचितूं ॥ ५९ ॥ जंवजंवजाणूंजाइजे ॥ तं
वतंवकांहींचिनव्हिजे ॥ जाणणेंविसरिजे ॥ तें
स्वरूपतूं ॥ ६० ॥ जेंज्ञानाज्ञानासीवेगळ ॥ तेंचि
परमज्ञानकेवळ ॥ तेंस्वयंज्योतीनिर्मळ ॥ पर-
ब्रह्मतूं ॥ ६१ ॥ जेंसर्वत्रअसे ॥ परीकांहिंचीन

वि· ७०॥जेथेंयुक्तीखुंटली॥ अहंतागळाली॥ तें· उ·
८० थेंज्ञप्तिप्रकाशली॥ आपणपांची॥७१॥जेंध्ये
यनाध्याता॥चिंत्यनाचिंतिता॥ तरींकासया
सारिखेंआतां॥ बोलावेंतें॥७२॥जेंहेतुदृष्टांत
विवर्जित॥ अनुपम्यसुखभरित॥ द्वैताद्वैत
रहित॥ परमतत्व॥७३॥ जेंअक्षराचियेवाटे
॥ आणीकहींचनभेटे॥ तेंअनुभवाचियेपेंठे ८०
॥ मिळेस्वात्मरूप॥७४॥ बोलावचनाकाजें॥

जंवजंवस्वरूपआठविजे॥ तंवतंवतेथेंचिबु
डिजे॥ तरीबोलावेंकवणे॥ ७५॥ असोहेंस्व-
रूपवर्णन॥ ब्रह्मतें अकथ्यजाण॥ जाणूंनि-
कांहींचनेणा॥ तें अनिर्वाच्यतूं॥ ७६॥ ॥

इतिश्रीमद्विवेकसिंधौसंव्हारक्रमेगुरुशिष्य
संवादे भेदखंडन पूर्वकं अद्वैतप्रतिपादकंना
म अष्टमंप्रकरणंसमाप्तम्॥ ८॥ ॥

॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥

वि श्रीगणेशायनमः।। आतांसांगिजेलकौतुक उ
८१ ।।तेंतूंएकाग्रऐक।। जेंऐकिलियासकळहोय
एक।। केवळब्रह्मजें।। १।। जंवजीवेश्वरउपा-
धींसी।। ऐक्यनेणिजेउभयांसी।। तंवऐक्यतत्वं
पदार्थांसी।। नोमनोरथमायेचा।। २।। ह्मणूनि
समस्तउपाधींसी।। ऐक्यकार्यकारणासी।। जा
णावयापरमतत्वासी।। स्वयेंअद्वैतसिद्ध।। ३।। ८१
ईश्वरदेहब्रह्मांड।।जीवांचेसकळहिपिंड।।

स्थूलभूतांचे दळवाड॥ म्हणूनि ऐक्य नया ४
स्थूलभूतें तीं कारण॥ पिंड ब्रह्मांड तत्कार्य जा
ण॥ तरी कार्यकारणासी कवण॥ भेद बोलिजे
॥५॥ कार्य नाहीं कारणेंविण॥ म्हणूनि तेणेंसी
तें अभिन्न॥ सूतवस्त्राचें निदर्शन॥ तेथ जा-
णावें॥६॥ ना तरी स्कवर्ण आणि भूषण॥ तें क
द्रांचन नव्हे अन्य॥ तैसें ब्रह्मांडेसीं भिन्न॥ नव्हे
तो पिंड॥७॥ ब्रह्मांडींची अवस्था उत्पत्ति॥ ते

वि· चिपिंडींजाणजागृती ॥ नयासीऐक्यत्व करिती उ·
८२ ॥ हेंकायबोलावें ॥ ८ ॥ अभिमानीजोविश्व ॥ तो
चतुराननाचाअंश ॥ नयासीऐक्यहाविश्वास
॥ बिजांकुरन्यायें ॥ ९ ॥ हिरण्यगर्भप्रभूचालिं
गदेह ॥ ऐक्यभावनिःसंदेह ॥ सकळजीवसमू
ह ॥ जाणावेऐक्यरूप ॥ ० जेसेलोहाग्नीचेस्फु-
लिंग ॥ लोहपिटितांउठतीअनेक ॥ नानरीगं ८२
गेचेतरंग ॥ नव्हतीगंगेनात ॥ ५१ ॥ तेसेहिरण्य

गर्भाचे अंश ॥ ते प्रसिद्धजीवकोश ॥ आत्मा पावे गर्भवास ॥ संगें जयाचेनी ॥ १२ ॥ हिरण्यगर्भाचें प्रतिपालन ॥ तयाचा अंश जीवाचें स्वप्न ॥ ह्मणूनि जीवेश्वरांचें एकाचि जाण ॥ अवस्थाद्वय ॥ १३ ॥ लिंगदेहाचा अभिमानी तेजस ॥ तोचि सकळ हीं विष्णूचा अंश ॥ तयांसी ऐक्य निःशेष ॥ कार्यकारणन्यायें ॥ १४ ॥ महतत्वरूप प्रकृती ॥ तिचा अंश जिवाची अज्ञा

वि नशङ्का॥ तयासीऐक्यहेंनिश्चिती॥ करणेंचिन उ
८३ लगे॥१५॥ प्रलयतोसर्वसंव्हार॥ क्षुभितय
चा अवतार॥ तयासीऐक्यहानिर्धार॥ बोलणें
चिनलगे॥१६॥ संहार कर्तामहेश॥ प्राज्ञतय
चाअंश॥ हेदोघेअहंकारतामस॥ म्हणूनिते
एरूप॥१७॥ प्रभूचीशक्तिमहामाया॥ तेचि
जीविंआत्मज्ञानाचीछाया॥ तयेसीभेदंबोल ८३
तीयास॥ तेमूढजन॥१८॥ ईश्वरींजीसर्वसा

क्षिता॥ तियेचीप्रतिरूपतुरीयाअवस्था॥ त
यांसी ऐक्यरूपता॥ तुवांजणिजस॥ १९॥ ए
वंजीवेश्वरउपाधींसी॥ ऐक्यजेथेंउभयांसी
॥ तरींतदुपाधिजीवेश्वरांसी॥ भेदकवणाक
रील॥ २०॥ तंवबोलेशिष्यचक्रवर्ति॥ जाना
नाशाखवाचाश्रुती॥ भेदातेसत्यबोलती॥ तरी
मिथ्याकेंसा॥ २१॥ द्वासुपर्णासयुजासखा-
या॥ एवमादिकश्रुतिगुरुराया॥ भेदसत्यबो

वि लतीतरीकाययया॥अप्रमाण॥ २२॥ तंवअन तु
८९ थाचावेळाइत॥ बोलेश्रीगुरुनाथ॥ सांगिजेल
श्रुतिसंकेत॥ तोऐकपांतूं॥२३॥ आधिपूर्वप
क्षउद्धविजे॥मगतोसर्वथैवदूषिजे॥ स्वतांसि
द्धप्रतिपादिजे॥ तदनंतर॥ २४॥ ऐसावेदशा
स्त्राचासमाचार॥ म्हणूनिश्रुतिकरितसेभे-
दाचाउच्चार॥ करूनिमगतयासिमार॥ करी ८६
सर्वथैव॥२५॥ द्वासुपर्णासयुजा॥ हेश्रुतिपू

वेंपक्षींबुझ॥ तरीऐक्यविषयींसांगेनतुज॥
तेंऐकपातूं॥ २६॥ एकमेवाद्वितीयंब्रह्म॥भे
दातेंहीश्रुतिकरितसेभस्म॥ म्हणूनिभेदवा
दियाचेधर्म॥ पापरूप॥ २७॥ वचनएकऐक
॥ बोलिजेलजेंसार्थक॥ जेंपुरेकौतुक॥ ऐक्य
वादाचें॥ २८॥ हिरण्यगर्भलिंगदेहाविण॥
ब्रह्मांडपिंडनव्हेजाण॥ पिंडकार्यब्रह्मांडका
रण॥ म्हणूनिऐक्यतया॥ २९॥ स्थितिस्वभा

वस्थेपासाव॥ तेथीचेसांगेनअवयव॥ सृष्टि
जागृतीहेंनाव॥जयांसिबोलिजे॥३०॥तूंम्ह
णसीजेस्वमावस्था॥ तेलंवजागृतीचाउलथा
॥तरीजागृतीतत्कार्यव्यवस्था॥ केवींघडे॥३१
॥येथेंसांगेनपरिहार॥स्वमरूपाचानिर्धार॥
मनासीविषयांचाव्यवहार॥तेंस्वमबोलिजे
॥३२॥मनीविषयवासनास्फुरे॥मगधावेंइं
द्रियांचेनिद्वारें॥बुद्धीसीबाह्यविषयाचें ज्ञान

स्फुरे ॥ तेंजागृतीजाण ॥ ३३ ॥ म्हणूनिस्वभाव
स्थाकारण ॥ जागृतीलतत्कार्यजाण ॥ नयासी
ऐक्यहेंनिर्वचन ॥ बोलणेंनलगे ॥ ३४ ॥ विष्णु
तैजसाचालनय ॥ ब्रह्माविष्णुहे अद्वितीय ॥
एवंपितापुत्रअद्वय ॥ तंन्यायें ऐक्यलयां ॥ ३५
स्वभावस्थाअंकुर ॥ तोहिरण्यगर्भाचाविस्ता
र ॥ तोही अज्ञानलिंगाचा व्यवहार ॥ वटबीज
न्यायें ॥ ३६ ॥ म्हणूनिमायाअविद्येसी ॥ हिर-

वि: प्ययगर्भलिंगदेहासी ।। ऐक्य परस्परेंसी ।। तेंस्व उ:
८६ भावसिद्ध ।। ३७ ।। प्रळयस्क्षुभितयाकारण ।।
स्थितिस्वभावस्यातत्कार्यजाण ।। तेथेंऐक्या
चेंनिर्वचन ।। करणेंचिनलगे ।। ३८ ।। विष्णुते
जसाचिउत्पत्ति ।। तेरुद्रआज्ञापासावउपज
ली ।। सत्वरजासीतमीस्थिती ।। म्हणूनिऐक्य
नयां ।। ३९ ।। अज्ञानअव्याकृतातें ।। आत्मज्ञा ८६
नमूळमायाजनितें ।। म्हणूनितयांसीऐक्यनि

रूतें॥जाणावेंपैं॥ ४०॥ प्रळयसुषुप्तिव्यालि
या॥ सर्वसाक्षित्वआणितुरिया॥ कार्यकार
णभावेंतया॥जाणावेंऐक्यरूप॥ ४१॥ रुद्र-
प्राज्ञाचेंमाहेर॥ प्रत्यगात्मासर्वेश्वर॥तया
सीऐक्यनिरंतर॥ असत्चीअसे॥ ४२॥जया
कारणाचेंकार्य॥तेंतेणेंसीजाण अद्वय॥या
सकळातेंगुणसाम्य॥प्रसवलीपैं॥ ४३॥ एवं
कार्यकारणासी॥ऐक्यबोलिजेमायामयेंसी

॥ तरीतदुपाधीजीवेश्वरांसी॥ ऐक्यसिद्धी
शबलहीतत्वंपदार्थासी॥ ऐक्यजेथेउभयां
सी॥ तेथेंशुद्धजीवेश्वरचैतन्यासी॥ ऐक्यन
बोलतांलाभे॥ ४५॥ आतांअसोहाब्रह्मींचा
विवर्त॥ गुणसाम्यादिसमस्त॥ प्रपंचब्रह्मीं
व्यतिरिक्त॥ नोकांहींचनव्हे॥ ४६॥ जेंजेंपो
वीपानाहीं॥ तेंच्चिनेवस्तुपाहीं॥ यापरीसक
ळब्रह्महीं॥ प्रपंचजात॥ ४७॥ जैसारज्जुवी

गसर्प ॥ कांहींच नभ । सेनो आरोप ॥ म्हणूनि निर-
ज्जूचि तद्रूप ॥ ऐसें जाणावें ॥ ४८ ॥ नाना तरी आ-
पुलेनि अंगें ॥ जळचि तरंगाकारें हो लागे ॥ तें
सें ब्रह्म आभासूं लागे ॥ प्रपंचाकारें ॥ ४९ ॥ अ
लंकाराची कुसरी ॥ सोनेंची भासे नाना परी ॥
तैसें पाहातां तत्त्वानिर्धारीं ॥ ब्रह्मचि विश्वरूप
हें ॥ ५० ॥ मुळाकडूनि पाहातां ॥ वृक्षचि पानें
स्वादियासमस्ता ॥ ऐक्य ऐसें तत्त्वता ॥ अनुभ

वि॰ घासिये॥ ५१॥ वृक्षाग्रेकडूनिपाहिजे॥ तंवस्वा उ॰
८८ दियासिभेददेखिजे॥ ऐकाचिवृक्षासिविभागि
जे॥ अवयवभेदें॥ ५२॥ तैसेंएकाचीब्रह्मलिं
गातें॥ विदारितीभेदमत्तें॥ तयापुढेंमाकवळि
ते॥ ऐसेंजाणिजे॥ ५३॥ सर्वंखल्विदंब्रह्म॥ या
श्रुतिवादासिआलेंवर्म॥ ह्मणूनिभेदवादिया
चेंमतनाम॥ तूंझनेंघेसी॥ ५४॥ पुरुषएवेदं ८८
सर्वं॥ हेश्रुतिवादियाचेगर्व॥ सांडवितीह्मणू

निअपूर्व॥ अद्वैतमत्तपें॥ ५५॥ ब्रह्मैवसंसर
तिइति॥ ब्रह्मेयचविमुच्यतइति॥ हे श्रुतिभेदा
तें असेयासिती॥ ह्मणूनिसांडावेंतें॥ ५६॥
यापरीहें अद्वैत॥ जयासिअनुभवलेंनिश्चि
त॥ तेंजाणावेंमूर्तिमंत॥ परब्रह्मपें॥ ५७॥ प्र
पंचउपसंव्हारें॥ केवळब्रह्मचिउरे॥ तेंजाणा
वेंचतुरें॥ अद्वैतमतपें॥ ५८॥ महाद्वैतअना
रिसे॥ येथेंकेवळब्रह्मचिप्रकाशे॥ प्रपंचनि

वि· रासाचेंपिसें॥ नलगेनेथें॥ ५९॥ साचेंचीण उ·
८१ नाहींलटिकें॥ ह्मणूनि ओळखावेंतयातेंमो
टकें॥ ऐसेंज्ञानहोयनेटकें॥ तेंमहाहुतें॥ ६०
जैशा आपुल्याचिलहरी॥ पाणियासीनयेस
री॥ तैसेंइंद्रियांचेव्यापारीं॥ नलिंपेयोगिरा
ज॥ ६१॥ नातरीं आपुलेंनितंजें॥ जैसा अग्नी
नपोळिजे॥ तैसायोगेश्वरनलिंपिजे॥ पुण्य ८१
पापातें॥ ६२॥ जे अग्नीसीवेगळें॥ तेंचिअग्निं

संगेंजळे॥ तें अग्नीचीकेवळ॥ निजतेंजेंपें॥
६३॥ तैसेंसर्वब्रह्मजिहींजाणिजे॥ स्वयंब्र-
ह्मआपणहोइजे॥ तिहींकैसेनिबुडिजे॥
भवसागरीं॥ ६४॥ जयासीसकळब्रह्मझालें
॥ तयासीवेगळेंकायउरलें॥ एकासेउणेंला-
गलें॥ हें आथीचीना॥ ६५॥ मनजेथेंजेथेंजा
इल॥ तेथेंतेथेंब्रह्मचिफुरेल॥ नरीसमाधि
नलगेल॥ घाळणीतया॥ ६६॥ ऐकतयाची-

धि॰ प्रचिती ॥ जनकाचिया राज्यस्थिती ॥ नाना उ॰
९० संभ्रम सेविती ॥ डंडुळेना ॥ ६७ ॥ यद्यपि के
तुल अवसर ॥ जरी स्वरूपीं पडेल विसर ॥ ति
तुकें नितया संसार ॥ नाकळूं सके ॥ ६८ ॥ कव
ण एकाचि अंतुरि ॥ मी सुवासिनी ऐसें विसर
ला जरी ॥ नितुकानि वैधव्य दुःख समग्रीं ॥ के
वीं बुडे तें ॥ ६९ ॥ तैसी रजतमाची आवृत्ति ॥ क्ष ५
ण एक अवसरें संविति ॥ नितुकें नतया संसृति

॥ काय बोलूं ये ॥ ७० ॥ स्वात्मानुसरणासरिसि कर्मे जळती आपैसीं ॥ न यां संसृती कायसी ॥ बोलिजेल ॥ ७१ ॥ स्वधर्मांचीं कर्मे विचित्रें ॥ अशेष जळती प्रबोधमात्रें ॥ न यां सी प्रायश्चित्त आणिकें शास्त्रें ॥ कवणें बोलिजे ॥ ७२ ॥ जे कोमळ ज्ञानें आथिले ॥ तरी न व्हती संसारासी पांगिले ॥ पूर्ण बोधें ब्रह्म झाले ॥ तें बोलावें काय ॥ ७३ ॥ जैसें लवटें होइजे जेणें आंगें ॥

वि बैसीकातेयोचिबागें॥तैसेमलतेणेंअवस्था-
९१ संगें॥नबाधिजेयोगिराज॥७४॥अग्निमा-
जिजेपडिलें॥तृणकाष्ठनांचीआतलें॥तैसें
पूर्णबोधेंसिब्रह्मझालें॥प्रपंचजात॥७५॥प्र
वेशतांआपुलाअंतःपुरीं॥रायातेंकवणनिवा
री॥जरीरारवणाईतसहपरिवारीं॥असती-
कोटिसंरव्या॥७६॥तैसीसंप्रज्ञातसमाधी॥ ९१
प्रवेशतांकवणनिषेधि॥पूर्णबोधाचानिबु-

ष्ठि॥ तेस्वतंत्रकीं॥ ७७॥ असतां इंद्रियव्यापा
र॥ परीतोब्रह्मरूपें व्यवहार॥ पूर्णबोधासी
संसार॥ परमार्थचि॥ ७८॥ एवं द्विधासमाधी
च्चिया॥ तेंसीचालतांनेती घडिया॥ तवांउप
रजाणवितीनया॥ उपनिषदें॥ ७९॥ तोसर्वे
श्वराचा अवतार॥ जाण पूर्णबोधें योगींद्र॥ क
टाक्षमात्रें संसारज्वर॥ फिटेजयाचेनी॥ ८०
॥ तेणेंसीदर्शनस्पर्शन॥ जयासी घडे संभाष-

ण॥ तयाचें पापविध्वंसन॥ होय क्षणमात्रें॥
८१॥ सकळही तयें तीर्थें॥ भवनिरासी नव्हती
समर्थें॥ तें करावें श्रीगुरुनाथें॥ एकें पूर्णबोधें
ची॥ ८२॥ ऋषभदेवाचियेपरी॥ निर्विकल्प
दशा उठे जरी॥ तें ब्रह्मज्ञानाचा ग्रास करी॥ ब्र
ह्म चिन्मात्र जें॥ ८३॥ कर्मशेषें देहा वर्तती॥
परी ते कर्मबंधनें णती॥ देहीं विदेहमुक्ति॥
ऐसें यांतें ह्मणिजे॥ ८४॥ विदेहमुक्ताचें श-

रीर ॥ चिरकाळ नव्हे स्थिर ॥ न ये चरमदशे चे योगेश्वर ॥ विरळाचि पें ॥ ८५ ॥ निर्विकल्प दशेविण ॥ जीवन्मुक्ताचें कांहींच न व्हे न्यून ॥ ते ब्रह्मचि होती आपण ॥ तेथें न्यून तें काय ॥ ८६ ॥ ब्रह्मैव सन् ब्रह्माप्येति ॥ विमुच्यत इति ॥ हे श्रुति हृदय जीवन्मुक्तिं ॥ बोलिजे पूर्णबोधासी ॥ ८७ ॥ निर्विकल्पदशेविण स्फाटिका ॥ जरी न होती पैं ऐका ॥ तरी कां न राहाती शुकादि

कदेखा॥ तेथ विषयीं॥ ८८॥ नसुटिजे चरम-
दशेविण॥ ऐसें बोलती विवेकहिन॥ तयाधीट
वादियांतें कवण॥ दंडीतसे॥ ८९॥ शुकोमु-
क्तोवामदेवोमुक्तः॥ हें श्रुतिवाक्य असे बोलत
॥ शुकनेणीतरी भागवत॥ कवणें निरूपिलें ९०
ऋषभदेव प्रतिपाद्य॥ हे श्रुतीचे निसंवादें॥
वामदेवादिक ब्रह्मानंदें॥ निवालेपें॥ ९१॥
वामदेवादियोगेश्वर॥ नव्हती अंधमुकेब-

धिर ॥ निर्विकल्पदशा निरंतर ॥ हे तंव तयांसी
नाहीं ॥ १२ ॥ तरी वेदीं जीवन्मुक्त बोलती ॥ तेथ
विषयीं नाहीं निपत्ति ॥ ह्मणूनि सांडि हे भ्रांती
॥ संशय व्यतिरिक्त ॥ १३ ॥ प्रत्यक्षादिक प्रमा
णें ॥ तयांसी संभवती दूषणें ॥ तरी श्रुतिवाक्या
सी कवणें ॥ आरोपिजेल ॥ १४ ॥ कांच आणि
कामलादिक ॥ प्रत्यक्षासी दोष देख ॥ तयां तें
हीनविवेक ॥ मानिती प्रमाणें ॥ १५ ॥ पांचवेजें

वि अनुमान॥ तयासी प्रत्यक्ष असे दूषण॥ तया उ.
२४ सी स्वतंत्र कवण॥ निगमी बोलिले॥ १६॥ अ
र्थांतीं उपमान॥ तेथें सादृश्यादि प्रमाण॥ म्ह
णूनि सत्ताप्रमाण जाग॥ वेदें बोलिजे॥ १७॥
तथापि श्रुत्यानुसारें॥ अप्रमाणें होती प्रमाणें
नरें॥ म्हणूनि सत्ताप्रमाण चतुरें॥ वेद जाणा-
वा॥ १८॥ प्रमाणांतराची अपेक्षा॥ श्रुतीसी ना ९६
हीं हे विवक्षा॥ म्हणूनि निरापेक्षा॥ तूंचि एक

९९॥ वेदासीमानीअखंड॥ तेंनमानितीजे-
पाखंड॥ नयाधीटवादियांचें तोंड॥ कायनि
घांतराहे॥ १००॥ आतांअसोहायुक्तिप्रसंग॥
जीवन्मुक्तसर्वत्रनिःसंग॥ स्वरे कर्मप्रारब्ध
वेग॥ तंवचीवर्ते॥ १॥ प्रारब्धसंचितक्रियमा
ण॥ हेंत्रिविधकर्मजाण॥ तेंकर्मकेसेंकवण॥
सांगिजेल॥ २॥ जेकर्मआरंभिलें॥ तेणेंस्थू-
लदेहनिपजलें॥ तेंदेहारंभकबोलिलें॥ श्रु

 

माऽशुभकर्म॥ ३॥ यास्थूळदेहानंतर॥ होती
जियाशरीरें॥ तयांसिहेतुकर्मविचित्रें॥ तियें
संचितेंजाणावीं॥ ४॥ जेजेकर्मसंचित॥ फळ
द्यावयाहोयउदित॥ तेंजाणावेंजाणत॥ देहा
रंभक॥ ५॥ स्थूलदेहींकीजतअसिजे॥ तेंक्रि
यमाणकर्मबोलिजे॥ येणेंत्रिविधेंनबाधिजे
॥ तोयोगिराज॥ ६॥ सुखदुःखाचेनिसमयो
गें॥ प्रारब्धकर्मक्षयासिजायवेगें॥ जीवन्मु-

क्रउबगे ॥ गर्भवासातें ॥ ७ ॥ संचितकर्मासी
अंत ॥ ज्ञानाग्नीनें होयनिभ्रांन ॥ जैसास्वप्नी
चावृत्तांत ॥ जळेप्रबोधमात्रें ॥ ८ ॥ कर्मेजीक्रि
यमाणे ॥ तींज्ञानोत्पत्तींहोतीलीन ॥ याती
हींसंबंधींअकर्तेपण ॥ आधीचीना ॥ ९ ॥ ए
वंकर्मपाशत्रिविध ॥ ज्ञानाग्नीनेहोयदग्ध ॥
ह्मणूनिमायागुणाभवसिंधु ॥ नाहींब्रह्मविदा
सी ॥ १० ॥ देहींअसतांविदेह ॥ तेथदेहांत-

वि· क्वणासंदेह ॥ म्हणूनित्रिभुवनींनिःसंदेह ॥ टु·
९६ तूंचिऐक ॥ ११ ॥ स्वप्नींचियासिद्धाचाठसा ॥
प्रबुद्धासीआभासेजेसा ॥ तेविंयोगियाचेंश
रीरसहसा ॥ असतूंचिअसेना ॥ १२ ॥ ततोन
विचिकित्सती ॥ ऐसेंश्रुतिअसेंबोलती ॥ जरी
जीवन्मुक्ताचीस्थिती ॥ केसीनिरूपावी ॥ १३
॥ आतांअसोनजीवन्मुक्त ॥ स्वस्वरूपातेंअ ९६
नुभवित ॥ प्रपंचातेंअसेदेखत ॥ ब्रह्मरूप-

त्वें ॥ १४ ॥ जयाचे वेद बंदीजन ॥ तें तूं ब्रह्म नि
रंजन ॥ होसी आपणयां आपण ॥ विश्वाकारें तूं
॥ १५ ॥ जें आत्यंतिक निर्मळ ॥ परब्रह्म केवळ
॥ तें चि तूं सकळ ॥ विश्वाकारें ॥ १६ ॥ नातरी
घृताचिया टांका ॥ जैसिया घृताच्या कणि-
का ॥ तैसें ब्रह्म तूं व्यापक ॥ जगदाकारें ॥ १७ ॥
जग जीव ईश्वर ॥ तेथें नाहीं हा व्यवहार ॥ तें तूं
निर्विकार ॥ परब्रह्म ॥ १८ ॥ ऐसें स्वरूप निरू

पितां॥ शिष्यासीझालीतन्मयता॥ तृष्णीभू
तझालावक्ता॥ गुरुवननाप्रती॥ १९॥ ब्रह्मा
नंदसागरीं॥ मुरालीचित्तलहरी॥ तेथेंचि
उपमाकवणकरा॥ नयासमाधीस्फुरवाची॥
२०॥ ऐसागुरुशिष्यसंवाद॥ म्याकेलाविनो
द॥ म्हणतीराजयोगीसिद्ध॥ मुकुंदराज॥
२१॥ ॥इतिश्रीमद्विवेकसिंधौसं
व्हारक्रमेगुरुशिष्यसंवादेमहाद्वैतप्रतिपा

दनं नामनवमंप्रकरणंसमाप्तम् ॥ ९॥ ॥
श्रीगुरुनाथार्पणमस्तु ॥ ॥ शुभं-
भवतु ॥ ॥ छ॥ ॥ छ॥ ॥

श्रीगणेशायनमः॥ आतांइयेनिरूपणीं॥
जीवशीवगेलेहारपूनी॥ तेंउरलेंनिदानीं॥
आत्मरूप॥१॥ तेंतंवतुजअनुभवलें॥ पुस
णेंसांगणेंनाहींउरलें॥ तथापिप्रांजळकरू

वि निसांगितलें॥ पाहिजेतरीऐक ॥२॥ बोल उ
१८ णेंतरींघडे॥ परीमौनमुद्रातोंनमोडे॥ हेबो-
लणेंतेणेंपाडें॥ जाणिजेस ॥ ३॥ आत्मस्वरू
पकालक्षण॥ तूंऐसेंआक्षेपिसीवचन॥ त-
रीब्रह्मीचीरवुण॥ जेंसच्चिदानंद॥ ४॥ ब्रह्म
तरींअद्वय॥ तेथेंहेंपदत्रय॥ कींशोभेलहा
विस्मय॥ करणेंचिनलगे॥ ५॥ सतम्हणिजे १८
शाश्वत॥ तेंविज्ञानपणम्हणूनिचिद॥ तेंचि

स्वरूपयालागींह्मणिजेत॥ आनंदऐसें ६
ऐकेंप्रकारांतरेंनिरूपण॥ अस्तिभातिप्रि
यपण॥ हेंपदत्रयमिळून॥ येकलेंब्रह्म ७
अस्तिह्मणिजे आहे॥ भातिह्मणजेप्रकाश
रूपहोय॥ आणिआपणप्रिय॥ अद्वयत्वें॥
८॥ यदास्तितद्भाति॥ ऐसीअसेवेदश्रुति
जें आहे तेंचिप्रकाशरूपह्मणती॥ तेंचिप्रि
य॥ ९॥ आद्यत्रयब्रह्मरूप॥ ऐसेंशास्त्रबो

कि
११

लेंस्वरूप॥ यालागीं वेगळेपणाचें माप॥ ध
रूंनये॥१०॥ सत्यंज्ञानमनंतंब्रह्म॥ उपनि
षद्वाक्यपरम॥ तें ब्रह्मीचें सांगितलें वर्म॥
परीअविधानव्हे॥११॥ सच्छब्दें नित्यसन्मा
त्र॥ ज्ञानशब्दें ज्ञप्तिरूपचिन्मात्र॥ आनंद
शब्दें स्वानंदमात्र॥ परब्रह्मतें॥१२॥ जैसा
शुद्ध आणि तेजोमय॥ ऊष्मा मिळूनि पदत्र
य॥ सुर्यतरीं अद्वय॥ संचला असे॥१३॥

उ

शुद्धआणिप्रकाशमय॥ सीतलतामिळूनिप
दत्तय॥ तरीचंद्रतंवअद्वय॥ संचलाअसे॥ १४
श्वेततेसीचनम्र॥ नम्रतीचीमधुर॥ मधुरती
चीसारखर॥ वेगळीचनसे॥ १५॥ शुभ्रतोचि
मृदु॥ मृदुतोचिमकरंदु॥ परीकर्पुरतंवअभे
दु॥ येकलाअसे॥ १६॥ आरक्तआणिघन॥
किरणसांकतीसंपूर्ण॥ ऐसियेपरीचेंरत्न॥ ए
कलेंचिअसे॥ १७॥ हिरवीआणिसघन॥ प्र-

भाफांकेहरितवर्ण॥ परीतेपाचएकलीजाण
अभिंनत्वें॥१८॥पिंवळाआणिसुगंध॥अ
मृताऐसाअसेस्वाद॥परीआंबातंवप्रसिद्ध
एकलाची॥१९॥ काळाआणिकठिण॥वरीच
केंस्फलक्षण॥परीगंडकातंवअन्य॥नव्हेजेसी
॥२०॥नेत्रीसावळाघ्राणीसुगंध॥जिव्हेसीअ
पूर्वस्वाद॥परीतुळसीमंजरीस्वतःसिद्ध॥एक
लीच॥२१॥एवंनानाप्रमाणी॥नानादृष्टांत

साधनी ।। सच्चिदानंदनिरूपणी ।। दुसरेंना
हीं ।। २२ ।। ग्रंथांतरीं निरूपण ऐसें ।। जें असत्
ज्जडदुःख असे ।। तयाचेनि निरासें ।। सच्चिदा
नंद ।। २३ ।। तरी असज्जडदुःख नासे ।। ब्रह्म आ
लें सच्चिदानंददशे ।। ऐसें म्हणतां आलें हांसें
महानुभावां ।। २४ ।। अहो ब्रह्म सच्चिदानंद नस
तें ।। तरी असदादिकां सयानें निरसतें ।। म्हणू
नि हें आइतें ।। सच्चिदानंद ।। २५ ।। सूर्य अंधा

रातेंनासी॥ तेव्हां प्रकाशलयेत्यासी॥ ऐसें
नव्हे प्रकाशराशी॥ पाहिलाचि असे॥ २६॥ छा
येकरूनि पुरुषाचें रूप॥ कां पुरुषावरूनि छा
येचें होय माप॥ छायेसी व्यर्थचि आरोप॥
पुरुष जैसा तैसा॥ २७॥ ऐसा हा परमपुरुष॥
जेथें छाया मायेचा नाहीं भास॥ सच्चिदानंद
स्वरूप सोस॥ तो हि नाहीं॥ २८॥ सुखीं अस-
ज्जड दुःख नाहीं॥ तेंसच्चिदानंद म्हणू काई॥

परीनह्मणतांठाईचाठाई॥ सच्चिदानंद॥
२९॥ यालागींसत्‌तेंचिचित्॥ चित्‌तेंचिआ
नंद॥ पदत्रयींअभेद॥ एकलीवस्तु॥ ३०॥
एकमेवाद्वितीयंब्रह्म॥ नेहनास्तिकिंचनहें
वर्म॥ तुजजाहालेंसुगम॥ सद्गुरुकृपें॥ ३१॥
जेव्हांपरोक्षपूर्णचैतन्य॥ तेव्हां ध्येयपरोक्ष
प्रत्यक्‌चैतन्य॥ आतांअपरोक्षपूर्णचैतन्य
॥ प्रत्यक्‌चैतन्यसांगकोठें॥ जेव्हांप्रत्यक्‌चै

तन्यनाहीं।। तेव्हां शिष्यत्वकेंचें काई।। गुरुत्व
हीठाईचेठाई।।पारुशलेंकीं।। ३३।। ऐकूनिशि
ष्यशिरोमणी।। मांथाठेवीसद्गुरुचरणीं।। म्ह
णेब्रह्मसुखाचीसुराणी।।पुरविलीस्वामी।।३४
मजमाझियानिरूपिणीं।। सुखकेलेंपीयूषपा
नी।।ब्रह्मासीब्रह्मत्वज्याचेनी।। तोतूंसद्गुरु ३५
मजब्रह्मत्वाचीनाहींचाड।। तुझेंभजनअत्यं
तगोड।। भजनेंवीणकोड।। कांहींनाहीं।।३६।।

तें तुझें भजन कैसें ॥ जेथें शिष्यपण चिनुमसे
ऐसें कृत्रिम एकरसें ॥ स्फगमजे कां ॥ ३७ ॥
स्फगम तुझी येकृपे करूनी ॥ वृंदास तेणें दुर्ग-
मजनी ॥ ऐसी भक्तिमजलागुनी ॥ दिधली-
च देईं ॥ ३८ ॥ जे भक्तीने ऐसें केलें ॥ तें मी नावि
संचे पाउलें ॥ ऐसें भजन दिधलें ॥ पाहिजे देवा
॥ ३९ ॥ तुझे ठाई प्रेमभाव ॥ जीव गेला परी तो
न जावो ॥ ऐसा प्रार्थिला गुरुदेव ॥ शिष्यरायें

४०॥ तंवतोअनाथाचानाथ॥सद्गुरुजोसम-
र्थ॥ह्मणेसर्वसिद्धांतमथितार्थ॥तुजचिफा
वला॥४१॥हेंवेदाचेंसर्वस्व॥नेथेंपाषंडिया-
नाहींविश्वास॥जेंब्रह्मप्राप्तिवरीभक्तीचासो
स॥कायह्मणूनी॥४२॥तरीब्रह्मप्राप्तीचीप
दवी॥तीहींकानींचिऐकावी॥परीसद्गुरुभ
जनेवीणअनुभवीं॥नव्हतीचकीं॥४३॥ते
आपुलीयाचीमती॥नानापरीच्यायुक्तिचाळ

ती॥ परीसाधुवचनी चित्तवृत्ती॥ देती चिना
४४॥ ज्यांसी नाहीं साधुभजन॥ त्यांसी हें तत्व
ज्ञान॥ उपदेशूं नये पयःपान॥ भुजंगा जसें॥
४५॥ ऐसें ऐकूनि अनुशासन॥ लक्षणशील मी
धरीन मोन॥ हें हीन करावें आपण॥ प्रामपु
रुषें॥ ४६॥ शुद्ध सात्विक गुरुभक्त॥ शुद्धम-
ती आणि विरक्त॥ ऐशिया शिष्यासी यथोक्त॥
॥ उपदेश करीं॥ ४७॥ तरीं उपयोग होइल॥

वि· अन्यथावायांजाइल॥ परीतुझीस्क्तीवाढेल उ·
१०४ किंवाढळेल॥ ऐसेंनाहीं॥ ४८॥ तुझियेसहज
स्थितीमाजीपाहीं॥ पात्रापात्र आलेंचिनाहीं
॥तथापिउपदेशसमयीं॥ पात्रापात्रविचार॥
४९॥ पूर्वीलजेमहानुभाव॥ तैसाआचारतैसा
निभाव॥ तैसाचितयांअनुभव॥ प्राप्तहोय
॥५०॥ यालागींमूळगुरुआरंभुन॥ कीजेपू- १०४
र्वजांचेंकथन॥ आणिसांगिजेलत्यांचे आ-

चरण॥ म्हणे मुकुंदराजयोगि॥ ५१॥ ॥

इतिश्रीमद्विवेकसिंधौसंव्हारक्रमेगुरुशि
ष्यसंवादेसच्चिदानंदपदत्रयविवरणंनाम
दशमंप्रकरणंसमाप्तम्॥ १०॥ ॥
श्रीगुरुनाथार्पणमस्तु॥ ॥ शुभं
भवतु॥ ॥ छ॥ ॥ छ॥ ॥
॥ ॥ ॥ ॥ ॥

कि श्रीगणेशायनमः॥ जोपरमात्मासर्वेश्वर॥स उः
१०५ र्वज्ञपरात्पर॥ तोचिएकआदिगुरु॥ सकळ
जीवांसी॥ १॥ तयाचेनिप्रसादें॥ सनकादिक
योगिवृंदें॥ तरलेलीलाविनोदें॥ भवसागर
॥ २॥ तेथीलअनुग्रहजरीघडे॥ तरींज्ञानहो
यरोकडें॥ मगसंसाराचेंसांकडें॥ तेंकवणासी
पें॥ ३॥ ईश्वरअनुग्रहाविण॥ नाहींपापनि- १०५
कृंतन॥ म्हणूनितोचिएकजाण॥ भवनिरस

नासी ॥ ४ ॥ जैसा दीपापासावदीप ॥ ते थेंना
हीं आणिक आरोप ॥ निज तेजें अन्यरूप ॥
मुख्य बिंबाचितें ॥ ५ ॥ वातीचे दळवाडें ॥ तेणें
दीप अन्य अन्य घडे ॥ परी तेज तें एकचि फुडें
॥ मुख्य दीपाचें ॥ ६ ॥ एका दीपाचा प्रकाश ॥
घरोघरीं होय बहुवस ॥ परी उणीवेचा सोस ॥
नाहीं मुख्य दीपीं ॥ ७ ॥ तैसा ईश्वरासी संबंध
जया घडे दैवसिद्ध ॥ तो जाणावा प्रसिद्ध ॥ ई

वि श्वरावतार॥ ८॥ यापरी शिष्यपरंपरा॥ ते उ·
१०६ जाणईश्वरावतार॥ अज्ञानाचे अंकुर॥ तेथें
आर्थीचिना॥ ९॥ ईश्वराचाज्ञानदाहक॥ जें-
थें प्रगटलानिःशेष॥ तेथें जीवित्वाचा कलं-
क॥ उरेलकैसेनी॥ १०॥ ज्ञानविग्रहीईश्वर॥
तोचिझालायोगेश्वर॥ तेथें देहद्वयाचाव्यव
हार॥ तोतंवसाचनव्हे॥ ११॥ सृजितसृष्ट्या १०६
दिकार्य॥ ईश्वरीचेंसकळऐश्वर्य॥ हेंजाणावें

बहु आश्चर्य॥ जयाचें तेणेंचि पें॥ १२॥ सृष्ट्या
दिककार्यकरणें॥ तें योगेश्वर कानेणें॥ ऐशा
आक्षेपीं सागों तीशा हाणें॥ तें ऐकज्जसु १३ यो
गेश्वराचें देह द्वय॥ तें नव अविद्यामय॥ नरीं
निपजेल सृष्ट्यादिकार्य॥ केंसेनी पा॥ १४॥ प
रब्रह्मीं असतां व्यापार॥ सृष्ट्यादिकार्य करी
योगेश्वर॥ हा अशेष मायिक व्यवहार॥ नाहीं
बुद्धचैतन्यीं॥ १५॥ परब्रह्मींचे नाअंगलगें

वि· ॥सृष्ट्यादिमायाकरूंलागे॥तोतयेचेनियोगें उ०
१७७ ॥निरूपीईश्वरीतूं॥१६॥आणिअविद्येचेंम
हिमान॥तेंतंवअत्यंतहीन॥ह्मणूनिसृष्ट्या
दिनिर्माण॥नघडेयोगेश्वरीं॥१७॥आणी-
कएविचार॥साचनव्हेसृष्ट्यादिव्यापार॥तो
हीएकसंसार॥महास्थूळ॥१८॥आतांअ-
सोहायुक्तिविस्तार॥सृष्ट्यादिकार्यकरीजग १०७
दीश्वर॥तोहिकरीतसेयोगेश्वर॥तेणेंचिन्या

ये ॥ १९ ॥ एकाकिजदीश्वर ॥ उपाधीवशें विश्वा
कार ॥ तें ईश्वरेंसीं कैंचें अंतर ॥ जीवन्मुक्तासी ॥
२० ॥ ईश्वरीचें ईश्वरपण ॥ तें थेंहें चिपरमकार
ण ॥ जनभुलतें आपणायां आपण ॥ कवणेका
ळीं ॥ २१ ॥ स्वरूपातें विसरतां ॥ तरी ईश्वरकव-
णबोलिजता ॥ जीवाचियापरिसोसितां ॥ या
नायाती ॥ २२ ॥ ह्मणोनि ज्ञानविग्रहीं ईश्वरु
॥ तोचिब्रह्म विद गुरु ॥ तेथं करितां अन्यथा-

वि॰ विचारु॥ असेमहादोष॥ २३॥ यस्यदेवेपराभ उ॰
१०८ क्ति॥ यथादेवेतथागुरौहेश्रुति॥ ईश्वरगुरू-
सीऐक्यस्थिती॥ उपदेशीतसे॥ २४॥ कवणएक
महामूर्ख॥ गुरूसीदेखेजीवत्वतर्क॥ नयासी
होयमहानर्क॥ रौरवादिक॥ २५॥ जयाचेनीभ
वव्यथातुटे॥ अज्ञानापासूनिसुटे॥ तोईश्वर-
कांनघडे॥ कायह्मणूनी॥ २६॥ गुकारतोअज्ञा १०८
नअंधःकार॥ तयासीनिरासकरीरुकार॥ क

रितसेअज्ञानाचासंव्हार॥ म्हणूनितोगुरुवं
दिजे॥ २७॥ गुरुतोवस्तुघनवट॥ लघुत्वेंबोली
हालुवट॥ गुरुतोब्रह्मनिघोंट॥ म्हणूनिगुरू
म्हणिजे॥ २८॥ आताअसोहामतिप्रकाश॥
शिष्यजाणागुरुवंश॥ तेथधरावाविश्वास॥
ईश्वरबुद्धी॥ २९॥ जंवनेणिजेगुरुसंतती॥ तं
वनफिटेअज्ञानराती॥ नप्रकटेस्वयंज्योती॥
ब्रह्मसूर्य॥ ३०॥ वेदशास्त्रपुराण॥ नयासीबो

 लंनीअधःपतन॥जयासीनाहींपरिज्ञान॥ 
 गुरुपरंपरेचें॥३१॥म्हणूनिशिवादिगुरुपर्यं
त॥जाणावेंतेंअवधुत॥जेमूर्तनाअमूर्तव
त॥परब्रह्म॥३२॥परीसांगिजतीअवधुत
॥जेनिजानंदभरित॥जयाचीमहिमाविख्या
त॥लोकत्रयीं॥३३॥तरीआदिगुरुश्रीआदि
नाथ॥तेथूनिश्रीहरिनाथ॥तयाचाशिष्यर 
घुनाथ॥जोगुणसिंधु॥३४॥तयासिद्धांचेंच

रित्र॥सांगिजेलविचित्र॥ महापानकछेदन
पवित्र॥श्रवणमात्रें॥३५॥जीवाचेंअंतःकरण
॥झालेंकाळेंमलिन॥ मगनप्रकटे आत्मज्ञान
॥स्वस्वरूपाचें॥३६॥तेवेळींकृपाकुवांचाराणा
॥जीवांचाकरावयासोडवणा॥ अवतरला आप
ण॥वैकुंठनाथ॥३७॥ बाणगंगेच्यातिरी॥ म
नोहर अंबानगरीं॥ तेथेंप्रकटलेश्रीहरी॥जग
दीश्वर॥३८॥ माध्यंदिनीशाखे॥ अवतार के-

ळापरूमपुरुषें॥ चांपेगोरटनावंशें॥ अतिम-
नोहर॥ ३९॥ श्रीवत्सपदलपविलें॥ दक्षिण-
जंघेसमाविलें॥ कलियुगीं अवतरणाकेलें॥
ह्मणूनियां॥ ४०॥ वर्ततांमनुष्यवेशें॥ नयाते
कोणीचनोळखे॥ प्रत्यक्षनिधाननदेखे॥ जे
सादेवहीन॥ ४१॥ जयाचेंनामसंकीर्तन॥ क-
रितांपापनिकृंतन॥ तयासीमेखलाबंधन॥
पिताकरिताझाला॥ ४२॥ वेदशास्त्राचाअ-

भ्यास॥जयासीकरितांनलगेआयास॥जो
चतुर्विधवाचेचाईश॥ तेथेंविस्मयकैंचा॥४३
॥हरिनामेंसाक्षांत॥ अवतरलाअनंत॥ तेथी
चीमहिमाविख्यात॥ भविष्योत्तरींबोलिली
॥ ४४॥ माझीअतिमंदवाणी॥ मीमहिमा
कायकायवाखाणी॥जोवर्णितांवेदशास्त्र
पुराणी॥ अगाधमहिमा॥ ४५॥जैसाश्रीकृ
ष्णाचाअवतारु॥ तेणेंसंदीपनकेलागुरु॥

वे. वारानसीयेशंकरु॥तेणंप्रसन्नकेला॥४६॥ उ.
११ बारावर्षेपाशुपत॥आचरलामहाव्रत॥तेणें
पार्वतीसहित॥शंभुप्रसन्नकेला॥४७॥ना-
तरीदत्तात्रयमुनेश्वर॥जोमहाविष्णूचाअव-
तार॥तेणेंप्रसन्नकेलागुरुशंकर॥गौतमनि-
रीं॥४८॥तयाचिपरीअतिगहन॥हरीनेंआद-
रिलेंअनुष्टान॥तेणेंतपेंत्रिभुवन॥पोळतेंझा- १११
लें॥४९॥मगआपुलेनिइच्छावशें॥अनुष्ठाना

चेनी दशांशें ॥ हवन आदरिलें परेशें ॥ हरीनें
महाकुंडीं ॥ ५० ॥ तेथें महाधूम प्रकटला ॥ गग
नासी उपनचला ॥ तो जैसा जाणूनि घाला ॥ श्री
महादेवासी ॥ ५१ ॥ होमधूम्र श्यामल ॥ ज्वा-
लामाला नभमंडळ ॥ तिळाहुतींचा परिमळ ॥
फांके दाही दिशी ॥ ५२ ॥ नवें होतां सम्यक्कृत ॥
हवन करी हरिनाथ ॥ नवग्रह परिवारांत ॥ पु
रंदर जैसा ॥ ५३ ॥ झाली होमाची समाप्ति ॥ प

कि ११२

गआदरिली पूर्णाहुती ॥ तेथें प्रगटला स्वंज्यो
ती ॥ घृतधारेंसरिसी ॥ ५४ ॥ ज्या पूर्णाहुतीचा
ज्वाळा ॥ गगनचुंबीत विशाळा ॥ कनकवर्णसो-
ज्वळा ॥ कैशा गमल्या ॥ ५५ ॥ नातरीं सृष्ष्यानें-
कनकदंड ॥ गगनछत्रारोंवविला प्रचंड ॥ ते
थें प्रगटे चंद्रचूड ॥ म्हणूनियां ॥ ५६ ॥ जैसें गग
नाचा देउळीं ॥ ज्वाळा शिवलिंग प्रकटली ॥ म ११२
गस्नपनविधी आरंभिला ॥ हरीनें घृतधारें ५७

उ॰

असोनियेज्वाळेआंत॥ शंभूप्रकटलान मी-
म्हणात॥ जोभक्तांचावेलाइत॥ कृपासिंधु॥५८
॥तिन्हीदेवगुणमूर्ति॥ तयादेवांचियाशक्ति
॥तोदेखिलास्वयंज्योति॥ श्रीआदिनाथ॥
५९॥ मगहरीसीगाढआलिंगन॥ दिधलेंजग
दीश्वरेंआपण॥ क्षणएकदोघेझालेलीन॥
आनंदसागरीं॥६०॥ सुखासीमहासुखभेट
लें॥ किंवास्वानुभवासीपडपजोडलें॥ नेसें

वि आनंदेंफुजोंलागलें॥हरिशंकरते॥६१॥जें उ
११३ साझालियाविद्युल्लतापात॥जगहोयविकलि
न॥तैसेरुद्रतेजेंमूर्छित॥झालेऋत्विजगण
॥६२॥तेथेंकायवितलें॥तेंहोतांनाहींजाणि
तलें॥तेथेंजेंवर्तलें॥तेंअवधारिजो॥६३॥म
गदाशिवेंजाणितलें॥तंवहरिनेंविनविलें॥
जीप्रेमदेईआपुलें॥श्रीआदिनाथा॥६४॥जी ११३
तुमचियेकृपेचेलवलेशें॥फिटलेंजीवाचेंअ

ज्ञानपिसें॥ केलेंसांम्राज्यपद आपेसें॥ गीव
सीनपावे॥ ६५॥ ब्रह्मयासीब्रह्मपद॥ विष्णू
सीविष्णुपद॥रुद्रासीरुद्रपद॥ प्रसादेंजयाचे
नी॥ ६६॥ जयाचियासत्तें॥ सकळजीवांसी
आस्तिकत्वें॥तेंपरमचैतन्यनत्वें ॥ तूंचि
एक॥ ६७॥जेथींचियाज्ञापिकळे॥जीवासी
जाणिवेचासोहळा॥ तेपरमचैतन्यकेवळ॥
तूंचिएक॥ ६८॥द्वीपदादिकेंनगरें॥ रचूनिवस

विलीं तुवां शंकरें ॥ नेथें अहंते चे बडिवारें ॥ झा
ळासी जीवरूप ॥ ६९ ॥ स्वस्वरूपीं नविटत ॥ अ
ससी तूं सकळ हेतु ॥ जैसा क्षीराब्धि उचंबळत
॥ निजतरंगीं ॥ ७० ॥ तत्वतां तूं निर्विकार ॥ पर-
ब्रह्म निराधार ॥ जेणें तुवां आधारिलें साकार
॥ सुंदर श्रियें ॥ ७१ ॥ शांभवी तुझा चा मांगी ॥-
विश्वमंगला नत्वांगी ॥ अविनाशपणें तुज भो
गी ॥ शिवानंद हे ॥ ७२ ॥ चैतन्यरूप हे चित्ती ॥

तूंस्वसंवेद्यसंवित्ती॥ तूं परमानंद अनुभविती॥ स्वयंप्रकाशें॥ ७३॥ तुह्मी धरोतें वरोतें॥ दोघे निजानंदभरितें॥ अमूर्त झालीं मूर्तिमंतें॥ भक्तानुमहासी॥ ७४॥ जे पडले संसारघोरबंदी॥ नेणती आपुली शुद्धी॥ जयजय करुणानिधी॥ तुवां तारावें जी॥ ७५॥ तरी ज्ञान द्यावें स्वानुभव॥ जेणें तुटती भवाचे पराभव॥ भेटे निराकार निरवयव॥ परब्रह्म जें॥ ७६॥ ऐसें ह-

वि॰ ॥ अहंतानिःशेषनिमाली॥ ब्रह्मानंदसागरीं॥ उ॰
११६ ८४॥ जैसामहाप्रलयींगंगरोळ॥ झालियाजगभ
रेंब्रह्मगोल॥ तेथेंबुडालेंसकल॥ कोणजाणे॥
८५॥ तेथेंब्रह्मानंदेंचेववितें॥ आणीकनाहींरा
खतें॥ ब्रह्मानंदाचिआपणातें॥ अनुभवीतसे
॥८६॥ एकाचीजिव्हाअमृतेंविटे॥ नयासीअ
न्नरसाचापांगफिटे॥ कांहींएकहेंउपमाघटे॥ ११६
तयास्वानुभवासी॥ ८७॥ नानोक्षीरसागर॥

आपुलीचविज्ञाणेनिर्धार॥ तरीहेंउपमाजव
ळीएककरूं॥ स्वानुभवासी॥ ८८॥ अथवानि
रालंबगगन॥ जरीजाणेआपुलेंपूर्ण॥ तरीहें
उपमासामान्य॥ नयास्वानुभवासी॥ ८९॥ आ
तांअसोहेंकलिजगण॥ पडिलेहोतेसज्ञानहीं
न॥ तेहोऊनिलब्धस्मरण॥ उठतेझाले॥ ९०॥
तेथेंब्रह्मग्रहप्रकटला॥ तेणेंहरीसीबकिघेत-
ला॥ ऐसेंह्मणूनिपवतांझाला॥ होतेसमूह॥

वि॰ ९१॥ तंवयेरीकडेदिवसांबाविसां॥हरीसी- उ॰
११७ ह्मलीनदशा॥मगसमाधीविसर्जुनीआपेसा
॥उठताझाला॥ ९२॥जडचर्याआचरत॥पि-
शाचवत्खेळत॥निजानंदेंडुल्लुत॥हरीयोगि
राज॥ ९३॥ढाळेंढाळेंचालणें॥विसरतविसर
तबोलणें॥कांहींनेणोनीह्मंसणें॥हरिनाथासी
॥ ९४॥कर्मवासनासरली॥विवेकींइच्छानि ११७
मानी॥हरीसीपूर्णदृष्टीझाली॥म्हणवूनियां

॥ १५॥ नाहीं वस्त्र परिधान॥ कोणासीं गोष्टी संन्निधान॥ भरेना उभरे स्नान॥ तें आर्थीचीना॥ १६॥ त्रिकाळीं निरंजन॥ हरी करी अर्चन॥ हें आश्चर्य सकळ जन॥ देखतें जाह्याले॥ १७॥ समस्त देवता॥ घरीं पुरविती वस्तुजना॥ उपातिष्ठती चिंतिना॥ रिद्धिसिद्धी॥ १८॥ अचिंत्य अनंतशक्ति॥ हरीतें वोळगती॥ महासिद्धी खेळती॥ दृष्टिपुढां॥ १९॥ जयातें

वि· अवलोकनकरी॥ परमपुरुषश्रीहरी॥ नया उ·
१८ स्वानुभवाचीभरोवरी॥ होयआपसयाची॥
१००॥ सुरेंद्रभारतीमुख्य॥ हरीनेंबोधिले-
शिष्य॥ परीकृपाअसंख्य॥ फळलारामचं-
द्रीं॥१०१॥ कृपादृष्टीसरसी॥ समाधिप्रवर्त
लीरामासी॥ उन्मेषघेउनीमानसीं॥ ब्रह्मानं
दलो॥१०२॥ अठरादिवसपर्यंत॥ झालीउ ११८
न्मनीअवस्था॥ मनाचियावृत्तिसमस्ता॥

खुंटलियापें॥१०३॥मगसमाधीविसर्जिली
॥तुरियावस्थाप्रवर्तली॥जियेचेनिसकल
सृष्टिझाली॥शिवात्मकहे॥१०४॥वर्णाश्र
माचापांग॥नकरीरामनिःसंग॥अखंडफ
ळाराजयोग॥ह्मणूनियां॥१०५॥रामगु-
णाचासागर॥कींमहिमेचाआगर॥ब्रह्मवि
द्यादेताउदार॥तोचिएक॥१०६॥एकमुख्य
चतुरानन॥कींद्विभुजमधुसूदन॥नातो-

समदृष्टिमहेशान॥ तोरामचंद्र॥७॥ गर्वरहि
तमहेंद्र॥कीं मूर्तिसहितज्ञानसमुद्र॥ नातो-
निःष्कलंकचंद्र॥रघुनाथ॥१०८॥ रघुनाथा-
चागुणी॥समाननाहींत्रिभुवनी॥ म्हणूनि
तोचिएकयोगिजनी॥वंदिजेरामचंद्र॥१०९॥
अनेकशिष्यांप्रतिबोधिलें॥ तेब्रह्मसरवोंनि
घालें॥ ब्रह्मविद्येचेंनारूंकेलें॥ सकळजना-
सी॥११०॥ मेघांच्याधारागणवती॥ पृथ्वीचे

परमाणुमोजवती॥परीरघुनाथाचेगुणनवर्ण
वती॥शेषादिकां॥१११॥माझ्यामतीचाविस्ता
र॥नोविवेकमंदरथोर॥राममहिमेचापार॥
केवींवर्णवेल॥११२॥म्यासांगितलीगुरुसंत
ती॥ऐकतांहोयपापनिवृत्ति॥म्हणूनिश्र-
द्धापूर्वकचित्तीं॥ऐकावेंपें॥११३॥सूर्यबाह्य
तमनिरसी॥परीअंतरीनप्रकाशी॥तेंअज्ञा
ननपआपेसीं॥फिटेगुरुप्रसादें॥११४॥नल

गेवेदशास्त्राचापांग ॥ अभ्यासावानलगेअष्टां-
ग ॥ जरीपाविजेराजयोग ॥ श्रीगुरुप्रसादें ११५
॥ तपतीर्थांचाडोंगरे ॥ श्रुतिस्मृतीचीकामारें ॥
तयांअज्ञानविषयांकेवींसरे ॥ जेज्ञानेंविण ॥
११६ ॥ निर्वाळिलयांभक्तएकचांग ॥ जरीआच
रेलराजयोग ॥ परीनफिटतांअज्ञानपांग ॥ सु
टिकानाहीं ॥ ११७ ॥ भक्तदेवचूडामणी ॥ उद्धव
एकत्रिभुवनी ॥ तोहिअपरोक्षज्ञानदेउनी ॥

सोडविला श्रीकृष्णें ॥ ११८ ॥ भलतसेंतपकी-
जे ॥ भलताजपजपिजे ॥ परीज्ञानेंवीणनस्फ
टिजे ॥ अज्ञानंबहिर्मुखीं ॥ ११९ ॥ ह्मणूनिसद्ग
साजन्मावें ॥ ईश्वरातें ओळखावें ॥ नेणोंचित्त
शुद्ध द्वारेंपावावें ॥ ज्ञानअपरोक्षतें ॥ १२० ॥ प
शुपाशतोडितेंशस्त्र ॥ ज्ञानेंचिईश्वराचेंविचि
त्र ॥ परीजीवांचेंकेसेंकर्मसूत्र ॥ जीअनावडज
यें ॥ १२१ ॥ नेंस्वानुभवज्ञान ॥ नपाविजेगुरुकृ

कि पेंविण॥ म्हणूनि तेथींचें महिमान॥ अगाध अ उ॰
१२१ सें॥ १२२॥ आतां असो हें बोली॥ म्यां जी गुरुस्तु
तीकेली॥ तो मती पावली॥ गुरुपरंपरें॥ १२३॥
मज चतुर्वेदांसीं न जोडे॥ म्हणूनि हें बोबडें॥ जैसें
ऊंस दिसती वांकुडे॥ परी अंतीं रसाळ॥ १२४॥
शृंगारादि नवरस॥ हे जेथें दिसती विरस॥ तें
परब्रह्म एकरस॥ जाणावें पें॥ १२५॥ कस्तूरि १२१
कीर काळी॥ परिमळ तां सोरभें आगळी॥ तें-

सीआर्षहेबोली॥ परीब्रह्मस्वरवाची॥१२६॥श्रु
त्युज्ञानोत्पत्तिसीनयेप्रतिज्ञा॥ नरींतेथेंनक
रावीअवज्ञा॥ग्रंथश्रवणमात्रेंसर्वज्ञा॥होइजे
पें॥१२७॥रसिकमुद्राबोलिजेल॥नरींयथावि
स्तारपाविजेल॥परीपरमार्थनकळेल॥मधि
ताक्षरेंविण॥१२८॥येग्रंथाचेंहेंचिआश्चर्य॥
जेंरो कडेंस्वानुभवसौंदर्य॥ह्मणूनिऐकतासु
निवर्य॥विवेकसिंधु॥१२९॥जयांसीनाहींप्र

वि- तीति ॥ नेणती तर्कमुद्रेची स्थिती ॥ तयालागीं उ-
२२ महाराष्ट्रीं युक्ति ॥ केली ग्रंथरचना ॥ १३० ॥ उप
जण्याचा श्रम नेणे बाळ ॥ तयाचे मुखीं मिष्टा-
न्नकवळ ॥ स्ये जेवीं जननी कृपाळ ॥ अपत्य
विषयीं ॥ १३१ ॥ उपनिषदाचें निर्मित ॥ काढू
नि केला हा ग्रंथ ॥ तें चिकरीत शिष्यजात ॥ सि
द्धभोक्ते ॥ १३२ ॥ वेदांतशास्त्राचा मथितार्थ ॥ १२२
जो बोलें परमार्थ ॥ येणें ओळखिजे हृदयांत ॥ श्रो

तेजनी॥१३३॥यासंप्रदायाचाअभिमानी॥येआ
पणशूळपाणी॥तरीप्रीतिपावेतेथवचनीं॥स
र्वेश्वरीं॥१३४॥याग्रंथाचेंउत्तरार्धों॥जेंनिर्गुणनि
रूपमप्रसिद्ध॥ह्मणतीराजयोगासिद्ध॥मुकुंद
राज॥१३५॥ ॥इतिश्रीमद्विवेकसिंधौ॰गु
रुप्रशंसानिरूपणंनामएकादशप्रकरणंसमाप्त
म्॥११॥ ॥श्रीगुरुनाथार्पणमस्तु॥ ॥



मुंबई येथें रामजीगणोजीठाकुर यांचे छापखान्यांत छापिलें १७७८

इतिविवेकसिंधु
उत्तरार्द्धसमाप्त.